शांततामय सहजीवनाची निर्मिती करणाऱ्या दिशेला तंत्रज्ञानाचा विकास चालू आहे.

शेवटी या सगळ्या विषयाविषयी ज्यांनी खूप पूर्वी दिग्दर्शन करून ठेवलं अशा आधुनिक महाराष्ट्राचे शिल्पकार कै. श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या कोपरगावला केलेल्या भाषणातला एक उतारा उद्धृत करतो. ७ सप्टेंबर १९६७ ला ते असं म्हणतात :

''मी इंग्रजी हटाववाला नसून, 'हिंदी पाहिजे' म्हणणारा आहे. पण त्याचबरोबर मी हेही सांगू इच्छितो, की आमच्या देशातले उच्च शिक्षण हे मातृभाषेतूनच झाले पाहिजे. त्याशिवाय दुसरा मार्ग नाही. असे माझे स्पष्ट मत आहे.

आम्हांला समाजाच्या खालच्या थरापर्यंत शिक्षण पोहोचवायचे असेल तर ते परक्या भाषेतून तेथपर्यंत जाणार कसे? आज किती लोकांना इंग्रजी येते? म्हणजे वर्तमानपत्रातील मथळे वाचण्यापुरते नव्हे, नव्या विषयाचा अभ्यास करून त्या ज्ञानाचा वापर करण्याइतके इंग्रजी किती लोकांना येते? चार टक्के लोकांनाही नाही. म्हणजे देशातले ९६ टक्के लोक ज्ञानाला पारखे राहिले आहेत असा याचा अर्थ होतो. हे काय शास्त्र आहे? आम्ही म्हणतो की, देशामध्ये आम्हांला लोकशाहीची वाढ करायची आहे. आम्हांला सामान्य माणसाला मोठे करायचे आहे. पण अशाने सामान्य माणूस मोठा होणार कसा? त्याची सुरुवातीची सगळी शक्ती जर परकीय भाषा शिकण्यात निघून गेली तर तो पुढे काय करणार? उच्च शिक्षण मातृभाषेतून दिले पाहिजे याला एक दुसरेही कारण आहे. क्रांती होऊन, सामाजिक उलथापालथ होऊन, एक नवीन तऱ्हेचे जीवन बनले असे हिंदुस्थानात फारसे कधी घडलेले नाही. याचे खरे कारण असे आहे, की सामान्य माणसापर्यंत महत्त्वाचा विचार किंवा ज्ञान आम्ही कधी जाऊच दिले नाही.

ज्ञानभाषा आणि लोकभाषा एक झाल्याशिवाय समाजाचे जीवन समर्थ होत नाही, उन्नत होत नाही, विकसित होत नाही. ज्ञानभाषा एक आणि लोकभाषा दुसरी अशी हिंदुस्थानच्या जीवनाची परंपरागत कहाणी आहे. लोकभाषा अशा तऱ्हेने दुर्लक्षित राहिल्यावर लोक शहाणे होणार तरी कसे? आता स्वातंत्र्यानंतर जेव्हा आम्हांला जनजीवन विकसित करायचे आहे असे आम्ही म्हणतो, तेव्हाही लोकभाषा ज्ञानभाषा होणार नसेल, तर ज्ञानभाषा हा ज्यांचा मक्ता होता त्यांचेच संस्कार आणि त्यांचेच साम्राज्य सांस्कृतिक जीवनामध्ये निर्माण होईल. ते होऊ देता कामा नये; असे माझे स्वत:चे खंबीर मत आहे.''

मा. यशवंतरावांचे हे विचार आमच्या नाकर्तेपणामुळे आज तब्बल ४५ वर्षांनंतरही किती समर्पक, प्रासंगिक आणि मार्गदर्शक आहेत हे वेगळे सांगण्याची काय गरज आहे?

जाताजाता एक सांगेन की, आमचे जे भाषा विषयातले तज्ज्ञ आहेत किंवा साहित्यातले काही तज्ज्ञ आहेत, ते तंत्रज्ञानाचा भारी तिरस्कार करतात. पण आजच्या डिजिटल युगातले युवा आता डिजिटल तंत्रज्ञान वापरूनच त्यांचे बहुतेक सर्व दैनंदिन व्यवहार करणार आहेत. भाषा कुठलीही असो, भाषिक व्यवहारांसाठी तंत्रज्ञानाची अपरिहार्यता त्यामुळे नाकारून कशी चालेल? अशा परिस्थितीत आमच्या भाषेला खरं वैभव हे तिला तंत्रज्ञानाची भक्कम जोड दिल्यामुळेच प्राप्त होणार आहे.

मला एक किस्सा आठवतो. तो असा की, ज्यावेळेला गुस्ताव आयफेल हा पॅरिस शहरामध्ये आयफेल टॉवर बांधत होता; त्यावेळेला पॅरिस शहरातले लोक त्याच्यावर भारी नाराज होते. कारण



अनुक्रमणिका

काय तर पॅरिस सारखी आमची रम्य नगरी आणि त्याच्यामध्ये कुठे हा लोखंडी असा उंच मनोरा बांधताय तुम्ही, वगैरे, अशी त्याच्यावर टीका व्हायची. ट्रेड फेअर जवळ जवळ येत राहिली आणि त्यावेळी त्याचं उद्‌घाटन व्हायला पाहिजे होतं, कारण ट्रेड फेअरचे ते प्रतीक होतं. गाय. दि. मोपासा नावाचा प्रसिद्ध फ्रेंच कादंबरीकार तर गुस्ताव आयफेलच्या मनोऱ्याचा कट्टर विरोधक होता. तो आयफेल टॉवरच्या इतकं विरोधी लिहीत असे की आयफेल कधी उत्तर देण्याचं वगैरे धाडसच करत नसे. प्रयत्नांती शेवटी आयफेल टॉवर उभा होता. आयफेल टॉवरच्या वरती एक कॉफी बार बांधण्यात आला.

गाय.दि.मोपासा, आयफेल टॉवर झाल्यानंतर रोज वरती चढून जायचा. आजच्यासारख्या लिफ्ट नव्हत्या त्यावेळी. तरीही चढून जाया. तिथं बारमध्ये कॉफी पीत बसायचा आणि तिथे बसून आयफेल टॉवरच्या विरोधी लेखन करायचा. ते प्रकाशितही व्हायचं. पॅरिसमध्ये लोक ते मोठ्या चवीने वाचायचे. शेवटी लोकांनी त्याला विचारलं की, अरे, तू एवढा आयफेल टॉवरला विरोध करतोस आणि रोज मात्र तिथेच जाऊन त्याच्याविरुद्ध लेख लिहितोस, हे विसंगत नाही का? त्यावर मोपासानं उत्तर दिलं. तो म्हणाला "काय करणार? आता आख्ख्या पॅरीस शहरात आयफेल टॉवर ही एकमेव अशी जागा शिल्लक राहिली आहे की जिथून मला आयफेल टॉवर दिसत नाही!! माझी रम्य पॅरिस नगरीच फक्त दिसते." तंत्रज्ञानाचा तिरस्कार करणाऱ्या मराठी प्रेमींना मला एवढंच सांगायचंय की, यापुढे तुमच्या मराठीची रम्य नगरी तुम्हाला फक्त आधुनिक माहिती तंत्रज्ञानाच्या उंचच उंच आयफेल टॉवरवरूनच दिसणार आहे!!

◇◇◇


**विवेक सावंत**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित,
५०१, आयसीसी ट्रेड टॉवर, ए विंग, पाचवा मजला,
सेनापती बापट मार्ग, पुणे ४११०१६
फोन : ९८२२०५२९१४ ई-मेल : md@mkcl.org


**दत्तो वामन पोतदार**

ना. गो. चापेकर यांनी 'पत्रिके'ला सामाजिक वळण लावण्याचा प्रयत्न केला. त्यापेक्षा वेगळे वळण देण्याचा प्रयत्न दत्तो वामन पोतदार यांनी स्वत:च्या संपादनकाळात केलेला दिसतो. जुलै १९३३ ते जाने. १९३६ ह्या काळात 'पत्रिके'चे बारा अंक पोतदार यांच्या संपादनाखाली प्रकाशित झालेले आहेत. प्रौढ व विवेचक टीका, प्रगल्भ परीक्षणे, इतर प्रांतांतील व जगातील साहित्यविषयक उलाढाली यांची माहिती अधिकारी लेखकांकडून प्रसिद्ध करावी, असे धोरण संपादकीय विचारातून प्रकट होते. 'साहित्य पत्रिका' ही केवळ काव्यशास्त्रविनोद-पत्रिका राहू नये, असा पोतदारांचा कटाक्ष होता. त्यामुळेच कथा-कवितांना त्यांनी 'पत्रिके'त स्थान दिलेले नाही. कथा-कविता प्रसिद्ध करणारी अन्य मासिके असताना 'पत्रिके'ने कथा-कविता देण्याचे प्रयोजन नाही, असे त्यांचे मत होते.





## वाङ्मय-शोभेचा साहित्यिक प्रवास

– सौ. सुषमा देशपांडे

*[वाङ्मयशोभा मासिकाचा साहित्यिक प्रवास संपादकीय कौशल्याचा वस्तुपाठ आहे. संस्थापक-संपादक म. म. तथा नानासाहेब केळकर ह्यांनी वाङ्मयशोभेला दर्जेदार साहित्यिक चेहरा दिला, तो त्यांच्या संग्राहक वृत्तीने! कवी-लेखक-चित्रकार-व्यंगचित्रकार-विचारवंत आणि छापखान्यातील कर्मचारी ह्या सर्वांनी एकाचवेळी झटून कालानुरूप साहित्याचे साक्षीदार होणे, ही एक मोठीच प्रयोगशाळा असते. सौ. सुषमा देशपांडे ह्यांनी ह्या प्रयोगशाळेचे रेखाटलेले हे भावचित्र! –संपादक]*

पु. रा. भिडे, तात्या ढमढेरे आणि गं. भा. निरंतर यांच्या साथीने १९३८ साली सुरू केलेल्या वाङ्मय-शोभेची संपूर्ण जबाबदारी मनोहर महादेव केळकर यांच्यावर आली आणि म. म. तथा नाना केळकरांना वाङ्मय-शोभा मासिकासाठी दर्जेदार मजकूर मिळवण्यासाठी प्रयत्न करावे लागले. अगदी सुरुवातीच्या काळात चुलते साहित्यसम्राट न. चिं. केळकर व प्रा. द. के. केळकर, आई गिरीजाबाई केळकर या घरच्याच साहित्यिकांचे लेखनसाहाय्य नानांना लाभले. पण हळूहळू तत्कालीन नामवंत लेखकांचे साहित्य मिळवायला सुरुवात केली आणि नानांना जवळपास ५५ वर्षांच्या साहित्यिक, संपादकीय कारकिर्दीत अनेक नामवंत, नवोदित साहित्यिकांचा सहवास लाभला. वाङ्मय-शोभेचा हा साहित्यिक प्रवास कसा सुरू झाला हे पाहणे अतिशय रंजक आहे.

केळकर कुटुंबीय सोडून वाङ्मय-शोभेला जे मोठे लेखक सुरुवातीच्या काळात लाभले; त्यांमध्ये ना. सी. फडके, श्री. म. माटे, गं. भा. निरंतर, वामन मल्हार जोशी यांसारख्या अनेक नामवंतांचा समावेश होता. यांमधील ना. सी. फडके, श्री. म. माटे यांनी अनेक उत्तमोत्तम कथा-लेख वाङ्मय-शोभेसाठी लिहिले. त्याचबरोबर वि. स. खांडेकर, पु. भा. भावे हेही वाङ्मय-शोभेचे लेखक. पण त्यातही भाव्यांशी नानांचे नाते जुळले; ते लेखकापेक्षाही मैत्रीचे अधिक!

नानांनी सभा-संमेलनांमधून फारसा भाग घेतला नसल्यामुळे साहित्यिकांची वर्तुळे, मंडळे, समित्या, संस्था इत्यादींपासून ते दूर राहिले. पण व्यवसाय आणि माणसे जोडण्याचा स्वभाव यांमुळे त्यांचा अनेक साहित्यिकांशी संबंध आला. नव्या उदयोन्मुख साहित्यिकांना प्रोत्साहन द्यायचे, त्यांना पत्रे लिहायची, त्यांच्याशी वैचारिक देवाणघेवाण करायची हा नानांचा परिपाठ. त्यातूनच त्यांनी शं. ना. नवरे, स. गं. मालशे, वसुंधरा पटवर्धन, मधु मंगेश कर्णिक, सदानंद रेगे यांसारखे लेखक जोडले. त्यांतले काही लेखक, लेखकापेक्षाही मित्र म्हणून अधिक घट्ट जोडले गेले. एकदा सदानंद रेग्यांबरोबर मंगेश पाडगावकर नानांच्या घरी आले आणि केळकर घराण्याशी इतक्या आपुलकीने इतके घट्ट जोडले गेले की नानांनी त्यांच्याकडून एक लेख मागवला, तेव्हा मंगेश पाडगावकरांनी लेख पाठवण्याची हमी एका कवितारूपी पत्राने दिली.






अनुक्रमणिका

*'जाहीर करतो तारीख आठ*
*त्या दिवशी मम निबंध येईल,*
*नाहीतर कवि शब्दाखातर*
*दाढी आपुली काढुनि देईल'*

दुसरे सुप्रसिद्ध कवी मनमोहन नातू यांचा वाङ्मय-शोभेशी जरी अल्प काळच स्नेह टिकला असला; तरी तो त्यांच्या बहराचा काळ होता. त्यांच्या कितीतरी कविता, दीर्घ कविता वाङ्मय-शोभेतून प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्यांच्या नानांनी कचऱ्यातून उचललेल्या 'राधे तुला सैल अंबाडा' या कवितेने किंवा

*'विश्वात फक्त आहेत । विख्यात बहाद्दर दोन*
*जे गेले आईकरिता । सागरास पालांडून*
*हनुमंतानंतर आहे । त्या विनायकाचा मान'*

या सर्वोत्कृष्ट कवितेने वाङ्मय-शोभा बहरून गेली ती नानांमधील गुणग्राहकतेमुळेच! मनमोहन नातूंमधील कवी शोधल्यामुळे, त्यांची 'राधे तुझा सैल अंबाडा' ही कविता, कवितेपेक्षाही गजानन वाटव्यांनी गायलेल्या गाण्यामुळेच गीत म्हणून अधिक गाजली. त्या काळी या गाण्याच्या दहा हजार रेकॉर्ड्स निघून एक नवा उच्चांकच गाठला होता. म्हणून मनमोहन नातूंनी,

*'मनोहर, तुझा*
*यशोदायी हात*
*केरातले सोने वेचणारा*
*तुझ्या 'परीक्षक' हाताने*
*'राधे तुझा सैल' मराठीला वाचवून दिले*
*जे 'कागद' रद्दीत गेले असते*
*त्यांना तू महोदयता दिलीस'*

या शब्दांत नानांचे आभार मानले.

वाङ्मय-शोभेचे आणखी एक लेखक जी. ए. कुलकर्णी. जी.एं.चा आणि नानांचा तीस वर्षांहून अधिक काळ पत्रव्यवहार होता, पण प्रत्यक्ष भेट तीन वेळाही झाली नव्हती. तरीही त्यांचा स्नेह अखंड होता.

अं. शं. अग्निहोत्री, भास्कर अनंत गुप्ते हे दोघे तर लेखक या नात्यापेक्षा मित्राच्याच नात्याने नानांच्या जवळ आले. महाराष्ट्राचे सलीम अली भानू शिरधनकर यांचीही 'बलवंतांचे आदर्श', 'रानातल्या सावल्या', 'सर्कसचे विश्व' ही तीन पुस्तके आणि अनेक लेखक नानांनी प्रसिद्ध केले. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे हा गुणी लेखक फार लवकर गेला आणि आपण त्याच्यासाठी काही करू शकलो नाही याचे नानांना फार दु:ख होते. ज्येष्ठ कवी-लेखक शांताराम आठवले हे तर नानांचे शेजारी. भिन्न स्वभाव आणि तरुण वयातील अहंता यामुळे दोघांच्या मैत्रीत जरी चढउतार झाले असले; तरी एकमेकांबद्दल आत्मीयता असल्याने दोघांमध्ये स्नेहबंध दृढ झाले.

नानांच्या आणि वाङ्मय-शोभेच्या साहित्यिक प्रवासात अनेक गुणी माणसे त्यांच्याजवळ आली, काही दुरावली, काही काळाने ओढून नेली. पण लेखकामध्ये असलेले गुण हेरून नानांनी माणसे जोडून वाङ्मय-शोभेचा प्रपंच सतत वाढताच ठेवला. नानांनी पुष्कळ गुणी लेखकांना प्रकाशात आणले. म्हणजे त्यांचे पहिलेवहिले किंवा प्रारंभीच्या काळातले साहित्य वाङ्मय-शोभेतून प्रसिद्ध केले. त्यांना नानांनी आवर्जून पत्रे लिहिली, त्यांच्या गाठीभेटी घेतल्या. त्यांना चांगल्या लेखनासाठी उत्तेजन दिले; आणि त्यांना चांगले लेखक म्हणून नाव मिळवून दिले.

१९५६ ते १९६४ पर्यंत पैसे देऊन लेखक मिळवायची धडपड नानांनी त्यांच्या ऐपतीप्रमाणे केली. त्यात अनेक नामवंत लेखक दुरावले गेले, नवोदित लेखक जोडले गेले. पण लेखकांच्या नावापेक्षा 'वाङ्मय-शोभे'च्या नावावरच वाङ्मय-शोभा खपली पाहिजे हा त्यांचा अट्टाहास होता. त्यासाठी त्यांनी कधीही तडजोड केली नाही. वाङ्मय-शोभा ही नानांच्या दृष्टीने वाङ्मयनिर्मितीची एक प्रयोगशाळाच होती. वाङ्मय-शोभेतून क्रमश: वा सुटा मजकूर पुढे त्यांनी मनोहर-ग्रंथमालेद्वारे पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला; आणि अनेक लेखकांनी

आपल्या लेखणीची कुवत प्रथम इथे अजमावली आणि नंतर बाहेर कीर्ती मिळवली. ह्यातील नावे घ्यायची झाली, तर यादी खूपच मोठी होईल. त्यातल्या काहींचा उल्लेख पुढे लेखात येईलच.

वाङ्मय-शोभेचे स्वरूप हे वाङ्मयीन असल्यामुळे त्याला कोणत्याच प्रकारचे साहित्य वर्ज्य नव्हते. वाद-परिसंवाद, मुलाखती, कविता, महिलाविषयक साहित्य अशा सर्व साहित्याने अंक परिपूर्ण करण्याचा नाना नेहमीच प्रयत्न करत. म्हणूनच त्र्यं. वि. पर्वते यांनी घेतलेल्या स. गो. बर्वे, न्या. छगला आणि स. का. पाटील यांच्या कसदार मुलाखती या अंकांतून नानांनी प्रसिद्ध केल्या. तसेच लोकमान्य टिळकांनी हिंदुत्वाची व्याख्या करणारा लेख 'चित्रमयजगत'च्या अंकात लिहिला होता. त्याचप्रमाणे १९०२ साली न. चिं. केळकरांनी इस्त्रायलसंबंधीच्या इंग्रजीतून लिहिलेल्या लेखाचे कात्रण मिळवून नानांनी १९४८ च्या मार्च-एप्रिल अंकात प्रसिद्ध केला. कालान्तराने वाङ्मय-शोभेचे अंक दुर्मीळ होतील तेव्हा निवडक, वेचक मजकुराची साठवण करण्याच्या हेतूने नानांनी अशा प्रकारचे साहित्य पुनर्मुद्रित करून केवढा मोठा ठेवा जतन केला आहे, हे आज वाङ्मय-शोभेचे जुने अंक चाळताना लक्षात येते. स्वातंत्र्योत्तर काळात पण प्रजासत्ताक भारत निर्माण होण्यापूर्वी सर्वसामान्यांच्या पुढे जे विविध प्रश्न होते त्यांवर नानांनी प्रा. द. के. केळकर, द. श्री. मराठे, दि. के. बेडकर, न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ अशा अनेक मान्यवरांकडून लेख लिहून घेऊन प्रसिद्ध केले होते.

कथा, कादंबरी यांच्या मानाने कवितांना वाचकवर्ग थोडा असला तरी, अनेक रसिक कविता आवर्जून वाचत असल्याने, कवितांचा विभागही वाङ्मय-शोभेतून प्रसिद्ध होत होता. कवी यशवंत व सोपानदेवांपासून अनेक कवींच्या कवितांनी हा विभाग सजलेला होता. डॉ. माधवराव पटवर्धन अर्थात



माधव जूलियन यांच्या निधनानंतर गोपीनाथ तळवलकरांनी त्यांच्यासाठी श्रद्धांजलीपर १४ रुबायांची 'अश्रुमाला' ही कविता आणि कविवर्य भा. रा. तांब्यांची 'जातोस भास्करा काय' या हृदयस्पर्शी कविता वाङ्मय-शोभेतूनच प्रसिद्ध झाल्या होत्या. कवितांच्या संदर्भात आवर्जून उल्लेख करण्यासारखी कविता म्हणजे भालचंद्र खांडेकरांची 'हीच राघवा, हीच पैंजणे!' ही कविता. रावणाने सीतेला पळवून नेताना, सीतेने वाटेत आपले जे दागिने टाकले; त्यातली फक्त सीतेची पैंजणेच मर्यादाशील लक्ष्मणाला बरोबर ओळखू येतात– या प्रसंगावरची ही कविता. पण या कवितेवर पुढे गाणे तयार होऊन अनेक रेकॉर्ड्सही खपल्या.

श्रीनिवास कुलकर्णी या कवीच्या कविता काळ्या शाईत अतिशय सुंदर अक्षरात लिहिलेल्या असत. म्हणून नानांनी एकदा त्यांच्या अक्षरातल्या कवितेचा ब्लॉक करून तोच अंकात छापला.

बहुसंख्य वाचकांचा अत्यंत आवडता असा वाङ्मय-शोभेतील कथाविभाग हा अतिशय संपन्न होता. त्या काळातील बहुतेक मासिकांचे कथा हे महत्त्वाचे दालन होते. संपादक या नात्याने नाना वाङ्मय-शोभेसाठी ज्याप्रमाणे नामवंत लेखकांच्या कथा मागवत त्याचप्रमाणे अन्य नवोदित लेखकांच्या अनाहूत कथाही नाना प्रसिद्ध करत. अगदी सुरुवातीच्या काळात 'लयलूट' या नावाचे अनुवादित





अनुक्रमणिका

कथांचे सदर वाङ्मय-शोभेतून चालू होते. नव्या पिढीच्या नव्या अभिरुचीचा आदर करत नवीन लेखक, नव्या कल्पनांचा स्वीकार करून नानांनी नव्या-जुन्यांचा वाङ्मय-शोभेतून मेळ साधला. म्हणूनच ते शेवटपर्यंत ताजेपणा टिकवू शकले. नवीन लेखकांना थोडे मार्गदर्शन करून, त्यांच्या कथांवर थोडे संस्कार करून त्या कथा प्रसिद्ध केल्या जात. अशा नव्या-जुन्या कथालेखकांच्या कथाविभागाला नानांनी आपल्या आत्मचरित्रातून 'अलिबाबाची गुहा' असे म्हटले आहे.

वाङ्मय-शोभेतल्या या अलिबाबाच्या गुहेत नवकथाकार गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, व्यवस्थापनतज्ज्ञ शरु रांगणेकर, आकाशानंद, मधु मंगेश कर्णिक, श्रीनिवास भणगे, जी. ए. कुलकर्णी, कुमुदिनी रांगणेकर, वसुंधरा पटवर्धन, धनश्री हळबे, श्रीधर देशपांडे, नारायण धारण, द. पां. खांबेटे, मृणालिनी देसाई असे अनेक साहित्यिक भेटतात. यातल्या अनेकांनी आपल्या लेखनाच्या कारकिर्दीस वाङ्मय-शोभेतूनच प्रारंभ केला होता. आज चित्रपटामुळे गाजत असलेली उषा दातार यांची 'काकस्पर्श' ही कथाही वाङ्मय-शोभेतूनच प्रसिद्ध झाली होती. नंतरच्या काळात मुक्ता केणेकर, पद्मजा फाटक, स्नेहल जोशी, अंजनी नरवणे, अंजली संभूस, आशा बगे, चंद्रकांत अंबाडे, वसंत जहागिरदार, उषा (श्रीहरी) परांडे, गोविंद भिडे, मोहिनी वर्दे, मंदाकिनी भारद्वाज, गिरिजा कीर, चंद्रकांत महामिने, राम क्षीरसागर असे असंख्य उत्तमोत्तम कथाकार वाङ्मय-शोभेला लाभले. वाङ्मय-शोभेतल्या लेखकांची यादीच करायची म्हटली किंवा कथानकं सांगायची म्हटली तर एक नवीन पुस्तकच तयार होईल. पण त्या कथा मुळातूनच वाचण्यात खरी गंमत. म्हणूनच ती 'अलिबाबाची गुहा' आहे.

एकूणच वाङ्मय-शोभेने साहित्यसेवा करताना लिंगभेद, प्रांतभेद, दलित-दलितेतर भेद, बाल-वृद्ध भेद असा कुठलाही भेदभाव न करता 'सुगंधित ते आदरावे । बकुल वा प्राजक्त' या भूमिकेचा स्वीकार केला. म्हणूनच वाचकांनी सदोदित नानांना त्यांच्या पसंतीची पावतीच दिली.

मान्यवर लेखक-लेखिकांबरोबरच चित्रकार-व्यंगचित्रकार यांच्यातलेही गुण हेरून नानांनी त्यांना वाङ्मय-शोभेशी जोडून ठेवले होते. व्यंगचित्रकार वसंत सरवटे, द.अ. बंडमंत्री आणि नंतरच्या काळातील अशोक डोंगरे यांनी आपल्या कारकिर्दीची सुरुवात वाङ्मय-शोभेतूनच केली. दलाल-मुळगावकर यांसारख्या नामवंत चित्रकारांच्या चित्रांनी वाङ्मय-शोभेची अनेक मुखपृष्ठे सजली. पण सौ. पद्मा सहस्त्रबुद्धे, वसंत सहस्त्रबुद्धे, अशोक डोंगरे या नानांशी घनिष्ट संबंध असलेल्या चित्रकारांनी वाङ्मय-शोभेच्या कथा-कवितांच्या सजावटीबरोबरच सुंदर मुखपृष्ठेही साकारलेली आहेत.

साक्षेपी संपादक या नात्याने नाना लेखकाच्या गुणांना प्रसिद्धीची सुंदर चौकट देऊ शकले. लेखक कितीही मोठा असला तरी तो आपल्या लेखनाकडे तिऱ्हाईत दृष्टीने बघू शकतो असे नाही. त्याचा अपुरेपणा जर नेमका त्याला पटवून दिला; आणि थोड्या परिश्रमाने त्याच्या लेखनकृतीला पूर्णता आणता येईल, असे जर आवर्जून त्याला सांगितले, तर त्याला ते पटतेही! असे नानांचे ठाम मत होते; आणि नेमका त्याचाच अवलंब नानांनी आपल्या मासिकाचे संपादन करताना केला. म्हणूनच अनेक मान्यवर नवोदित लेखक-लेखिका, चित्रकार त्यांना जोडता आले. या सर्वांच्याच सहकार्यावर वाङ्मय-शोभेचा प्रदीर्घ प्रवास करता आला!

❖❖❖

**सौ. सुषमा देशपांडे**
८ परशुराम पार्क,
रचना बालवाडी शेजारी, शरणपूर
नाशिक - ४२२००२
मो.: ९४०३५०९९१९

पुस्तक परिचय

# 'झिम्मा' - विजया मेहता

– डॉ. मेधा सिधये

'बाई विजयाबाई!' असा आदरयुक्त, दूरस्थ-जवळिकीने नाट्यक्षेत्रात ज्यांचा उल्लेख केला जातो, त्या विजया मेहता म्हणजे मराठी रंगभूमीवरील एक कर्तृत्ववान व्यक्तिमत्त्व! अभिनेत्री, दिग्दर्शिका, नाट्यशिक्षिका, नाट्यसंस्थेची अध्वर्यू, राष्ट्रीय पातळीवरील नाट्यसंस्थेची संचालिका, परदेशात मराठी, जर्मन, संस्कृत भाषांमध्ये नाट्यप्रयोग करणारी रंगकर्मी अशा विविध नात्यांनी १९५१ ते २०१० या दीर्घ कालखंडात त्यांनी महाराष्ट्रात प्रायोगिक आणि लोकमान्य (व्यावसायिक) रंगभूमीवर तसेच राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय रंगभूमीवर स्वत:चे स्वतंत्र स्थान निर्माण केले. आता त्या वयाने सहस्रचंद्रदर्शनाच्या समीप आल्या. चंद्रापर्यंत जाता येईल एव्हढी उडी मारायची ठरवली तर कुंपणापलीकडे तरी जाता येईल हे सूत्र त्यांनी आपल्या नाट्यप्रवासात मनाशी बाळगले होते; असे त्यांनी लिहिले आहे. हा त्यांचा ध्येयवाद आणि विनय विलोभनीयच.

'झिम्मा' या आत्मचरित्राचे लेखन गेल्या दोन वर्षांतले. ते लांबणीवर पडत गेले; त्याचे कारण त्या सांगतात– 'लिखाणासाठी मनाच्या खोल भुयारात शिरावं लागतं. एकांतात स्वत:भोवती घिरट्या घालणं गरजेचं होऊन बसतं अन् मला तर माझ्या सहवासाचा मनस्वी कंटाळा येतो. माझ्याजवळ फक्त मीच असले की मी पार बुजते. मला सतत कुणीतरी सोबतीला लागतं.' (पृ. १३) पण अखेर त्यांनी स्वत:ची सोबत स्वीकारली; आणि 'झिम्मा' हा सुरेल, ऐकत राहावा, मनात साठवावा असा 'खेळ' दिमाखात उभा राहिला. 'मॅजिक ऑफ थिएटर'चा शोध घ्यावा हा या लेखनामागचा हेतू त्यांनी सांगितला आहे. (पृ. १४) त्या म्हणतात, 'प्रत्येकजण आपला टीपकागद घेऊन येतो.' (पृ.१) विजयाबाईंनी व्यक्तिगत आयुष्यात आणि रंगभूमीच्या क्षेत्रात खूप काही संवेदनक्षमतेने टिपले आणि तेच सारे चिंतनमग्न भावावस्थेतले अनुभवसमृद्ध लेखन 'झिम्मा'मध्ये वाचायला मिळते. ताटस्थ्य आणि आत्मीयभाव, या दोन परस्परविरोधी वाटणाऱ्या भावनांचा संयमशील मिलाफ, या लेखनात दिसतो.

विजया जयवंत, विजया खोटे, विजया मेहता हे बाईंच्या जीवनातले तीन टप्पे–बायजी (आई), दुर्गाबाई खोटे आणि बाप्पायजी (फारुख मेहतांची आई) या तिघींविषयी त्यांनी खूप प्रेमाने, कृतज्ञतेने लिहिले आहे. कुटुंबातील व्यक्ती, घडामोडी इत्यादीं विषयी त्यांनी मधूनमधून आणि पहिल्या दोन-तीन प्रकरणांत लिहिले आहे. भर आहे तो अर्थात नाट्यक्षेत्रातील अनुभवांवर. वैयक्तिक अनुभवांचा अनुबंध नाट्यप्रयोगांशी नकळत पुढे कसा जोडला गेला ते वाचायला मिळते. भिवंडीच्या घरासंदर्भात. ती सामायिक इस्टेट. वडिलांची आई बाप्पाई तिथे राहात होती. वयाच्या सातव्या वर्षी पाहिलेले ते प्रशस्त घर, सभोवती झाडे, फुले, विहीर, घरात खूप माणसे आणि नोकरचाकर. एक दिवस अचानक बाप्पाईचे केशवपन चाललेले दृष्टीस पडले. हे सारे मनात खोलवर घर करून राहिले. पुढे इस्टेटीच्या वाटण्या होऊन ते विश्व विरून गेले; पण 'बॅरिस्टर', 'रावसाहेब' चित्रपट आणि 'वाडा चिरेबंदी' करताना मनाच्या तळाशी दडलेला बालवयातला अनुभव जागा झाला. त्या लिहितात, 'आमचं भिवंडीचं घर, बॅरिस्टर आणि वाडा चिरेबंदी यात एकच सूत्र सापडेल. सरंजामशाही व्यवस्थेचा ऱ्हास आणि फुफाट्यात अपरिहार्यपणे

सापडलेली माणसं.' (पृ. २६)

१९६७ ते १९७० या काळात विजयाबाई इंग्लडला गेल्या होत्या. त्यांची आई बायजी आजारी होती. निरोप घेताना ती एकटक पाहात होती. 'त्या नजरेत हुरहुर, कौतुक, काळजी, आईची माया असं सगळं होतं. कित्येक वर्षांनी 'संध्याछाया'त नानी करताना मला बायजीची ती नजर उपयोगी पडली.' (पृ. १६८)

विजयाबाईंचा नाट्यप्रवास सुरू झाला. १९५१ मध्ये पण १९४२ ते १९५२ या मंतरलेल्या काळात, त्यावेळची तारुण्याच्या उंबरठ्यावरची पिढी कशी घडत होती, त्याचा तपशीलही इथे वाचायला मिळतो. राष्ट्रसेवादलाचे संस्कार, रॅडिकल ह्युमॅनिझमचा प्रभाव, खादीचा वापर हे सगळे नंतर मागे पडले; पण शालेय वयात गांधीजी, साने गुरुजी, भाऊसाहेब रानडे, बाबासाहेब कर्णिक यांच्या विचारांचा मनावर पगडा होता. विल्सन कॉलेजमध्ये गेल्यावर नाट्यविश्वात त्यांचे पहिले पाऊल पडले. विजयाबाईंना पुढे खूप गुरू लाभले. केशवराव दाते, गणपतराव बोडस, मामा पेंडसे, दाजी भाटवडेकर, अल्काझी, आदि मर्झबान, त्यांच्या रोल मॉडेल दुर्गाबाई खोटे, निस्सीम इझिकेल, फ्रिट्झ बेनेव्हिट्झ, बिल लिनफर्ड, पीटर ब्रुक, पीटर स्लेड, एडवर्ड आर्जंट या सगळ्यांकडून खूप मिळाले, त्याविषयी त्यांनी विस्तृत लिहिले आहे. (नानासाहेब फाटकांचा मात्र या संदर्भात उल्लेख नाही. १९५३ मध्ये मुं. म. साहित्य संघाच्या 'झुंझारराव'चे ते दिग्दर्शक व प्रमुख भूमिकेत होते.) त्यांचा पहिला गुरू म्हणजे विल्सन कॉलेजमधला वर्गमित्र, अल्काझींचा शिष्य पी. डी. शिनॉय. त्याला नाट्य, चित्र, संगीत सगळ्याच कलांची जाण होती. त्यानेच प्रथम स्टेनिस्लावस्कीच्या भावनिक स्मृती (Emotional memories) च्या पद्धतीबद्दल तसेच Love the art in you, not yourself in the art अशा अभिनयाच्या मूलतत्त्वांविषयीही समजावून सांगितले. नाटकातल्या पात्राच्या भावनेतलं सत्य हुडकून काढणं म्हणजे अभिनयाचं मूलतत्त्व. त्यासाठी बरेचदा कलावंताला स्वत:च्या आयुष्यात डोकावून पाहावं लागतं हा मंत्र शिनॉयमुळे मिळाला; आणि अभिनय करताना त्याची प्रचीती कशी आली तो प्रसंगही मुळातून वाचण्यासारखा आहे. (पृ. ५१) विल्सनमधल्या गॅदरिंग्जची नाटके, भारतीय विद्या भवनच्या स्पर्धा यांबरोबरच मुंबई म. सा. संघाच्या नाटकांसाठी त्यांना बोलावले गेले; आणि अवघ्या दहा दिवसांत त्या 'झुंझारराव'मधील कमळजेच्या भूमिकेत उभ्या राहिल्या. त्यावेळी त्या भूमिकेत त्यांनी जे बदल केले ते के. नारायण काळे यांच्यासारख्या जाणकारालाही मान्य करावे लागले. अठरा-वीस वर्षांचे त्यावेळचे वय. पण भूमिकेचा कसून अभ्यास, चिंतन आणि थोरामोठ्यांपुढे दबून न जाता आपले म्हणणे त्यांना पटविणे, ते कृतीतून सिद्ध करणे हे विजयाबाईंचे गुण तिथे दिसले. साहित्य संघात त्या रमल्या पण पुढे तिथले नाट्यप्रयोग समाधान देईनात. काहीतरी नवीन, वास्तववादी, आशयसंपन्न असे रंगभूमीवर घडायला हवे असे वाटू लागले. अल्काझींच्या थिएटर युनिटमध्ये त्या शिकू लागल्या. तिथले प्रयोग पाहून भारावल्या. तिथले अ-मराठी वातावरण पाहून चकित झाल्या. नावीन्याची, प्रयोगशीलतेची त्यांना असलेली ओढ, सतत शिकत राहाण्याची आस, नवनवे अनुभव गाठीशी बांधत जाण्याची वृत्ती यातून त्या घडत गेल्या. थिएटर युनिटमध्ये खूप काही शिकायला मिळाले, त्याचे छान वर्णन त्यांनी केले आहे; पण त्याचबरोबर तिथे वाटणारा परकेपणा आणि साहित्य संघातले साधे, मनमोकळे वातावरण, तिथल्या मातीवर पाणी शिंपडल्यावर येणारा, सुखावून टाकणारा गंध याविषयीही लिहिले आहे. थिएटर युनिटमध्ये अभिनयावर भर नव्हता. अभिनयाच्या मूलतत्त्वांपाशी आपण पोहोचलो नाही, असे वाटायचे; हेही त्या स्पष्टपणे सांगतात.

सरकारी शिष्यवृत्ती मिळाल्यावर त्यांना आदि मर्झबान आणि दुर्गाबाई खोटे हे गुरू मिळाले. आदि

मर्झबान यांनी त्यांना विजय तेंडुलकरांचे 'श्रीमंत' दिग्दर्शित करायला सांगितले. हे त्यांचे पहिले दिग्दर्शन. त्या वेळी मनाची उडालेली धांदल, निराशा, औदासीन्य, रंगमंचावरील कोपऱ्यात रडत रडत झोपी जाणे या अनुभवाविषयी त्यांनी प्रांजलपणे लिहिले आहे. अस्सल कलावंताला साजेसा निखळ प्रामाणिकपणा 'वाडा चिरेबंदी'संबंधी लिहितानाही दिसतो. 'वाडा चिरेबंदी'मधली आईची भूमिका मला जमली नाही आणि म्हणून फारशी आवडली नाही.' (पृ. ३३३) असे आत्मपरीक्षण दुर्मीळ. 'श्रीमंत' ते 'वाडा चिरेबंदी' यात काळाचे केवढे अंतर. पण बनचुकेपणा आला नाही; हे विजयाबाईंचे मोठेपण.

विजयाबाईंच्या नाट्यजीवनातले महत्त्वाचे पर्व म्हणजे 'रंगायन'. 'रंगायन'ची स्थापना १९६० मध्ये भुलाभाई इन्स्टिट्यूटमध्ये झाली. १९६० ते १९७०-७२ या तपपर्वाविषयी विजयाबाईंनी विलक्षण खोल, प्रगल्भ, शांत समजुतीने लिहिले आहे. पण त्यात असलेला आर्त आंतरिक हुंदका वाचकाच्या मनाला स्पर्श करून गेल्याशिवाय राहात नाही. रंगभूमीवरील जुन्या-नव्या निष्ठावान कलाकारांना बरोबर घेऊन 'रंगायन' ही रंगभूमीची प्रयोगशाळा त्यांनी मोठ्या उमेदीने उभी केली. सगळ्यांची घट्ट मैत्री. नवनवे प्रयोग करण्याचा उत्साह. चुका करायला वाव. कष्ट करायची तयारी. सुरुवातीच्या चार-पाच वर्षांत 'रंगायन' बहरलं याचं महत्त्वाचं कारण म्हणजे भुलाभाई इन्स्टिट्यूटमध्ये सुरू असलेला कलेचा उत्सव. त्याचे नुसते वर्णन वाचूनही कलासक्त मन बहरून जाईल. १९६७ ते १९७० या काळात फारुख मेहतांशी विवाह करून त्या इंग्लंडला गेल्या. 'रंगायन'मधली त्यांची अनुपस्थिती हे एक कारण असू शकेल ती संस्था फुटण्याचं. याबाबत त्या लिहितात- 'रंगायनची कार्यपद्धती, इतर कलाप्रकारांचं रंगभूमीशी असलेलं नातं यावर माझा संपूर्ण विश्वास होता. हा माझा ध्यास आणि निष्ठा मी माझ्या बऱ्याचशा सहकाऱ्यांपर्यंत पोहोचवू शकले नाही, ही वस्तुस्थिती मान्य करणे आवश्यक'. (पृ. १८७) इथेच पुढे त्या लिहितात, 'इतरांच्यावर जबाबदाऱ्या सोपवण्याकडे माझा फार कल नव्हता की काय? संस्थेचा पत्रव्यवहारसुद्धा शेवटपर्यंत मीच पाहात होते. का? थोडक्यात 'ग्रुप लीडर' म्हणून मी थिटी पडले का?' (पृ. १८७) 'रंगायन' मधली फूट मला घटस्फोटाप्रमाणे त्रासदायक वाटली.' (पृ. १८८) असे विजयाबाईंनी लिहिले आहे. अखेर एक स्वप्न भंग पावले! अशा कितीतरी गोष्टी त्यांना पचवाव्या लागल्या आहेत. पुढच्या काळात संस्कृत 'मुद्राराक्षस'ची जर्मन भाषेतल्या प्रयोगाची व्हिडिओ टेप दूरदर्शनकडे दिली होती. ती तिथे हरवली. यावर विजयाबाई शांतपणे लिहितात- 'जीव लावलेल्या बऱ्याच गोष्टींचं होतं असं अनेकदा!' (पृ. २६४)

विजय तेंडुलकर, पु. ल. देशपांडे, अरविंद देशपांडे, अरुण कानडे, द. ग. गोडसे, के. नारायण काळे अशा अनेकांशी मतभेद झाले. पण सारे काही पचवून त्या नव्या उमेदीने उभ्या राहिल्या. १९७० ते १९७२ अशी दोन वर्षे त्यांनी 'रंगायन' तर्फे वर्कशॉप्स घेतली. त्यावर सविस्तर लिहिताना त्यांनी आपल्या प्रशिक्षणाची वैशिष्ट्येही सांगितली आहेत. होळी, सुलतान, यातनाघर या एकांकिका, ससा आणि कासव, मना सज्जना, माता द्रौपदी, देवाजीने करुणा केली ही नाटके केली. 'होळी'च्या मुंबई आय.आय.टी.च्या प्रयोगाच्या वेळचा अनुभव खूप काही सांगून जाणारा होता.

१९७२ च्या सुमारास लोकमान्य रंगभूमीवर पाऊल ठेवायचे ठरविल्यावर आलेला पहिल्याच नाटकाबाबतचा अनुभव त्यांना खूप अस्वस्थ करून गेला. त्यावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते की, त्यांना स्वत:ला आपल्याला रंगभूमीवर काय करायचे आहे, कसे करायचे आहे याची पक्की जाण होती, विचारात स्पष्टता होती; आणि प्रयोगशीलतेची ओढ होती. म्हणूनच त्यांच्या कर्तृत्वाचा आलेख उंचावत गेलेला दिसतो.

विजयाबाईंनी जर्मनीत, 'कॉकेशियन चॉक सर्कल' या ब्रेख्तच्या नाटकाचे चि. त्र्यं. खानोलकर यांनी केलेले रूपांतर 'अजब न्याय वर्तुळाचा' –याचा प्रयोग केला, त्याचे भरभरून वर्णन त्यांनी केले आहे. आंतरराष्ट्रीय संस्कृत परिषदेसाठी त्यांनी जर्मनीत 'मुद्राराक्षस' हे संस्कृत नाटक केले. ते उभे करताना त्यांनी केरळमध्ये जाऊन कुटियाट्टम हा केरळी नाट्यप्रकार, तेरुकुटु हा एकपात्री प्रयोग पाहिला. त्यातून संस्कृत रंगभूमीचे नाट्यसंकेत जाणून घेतले. 'मुद्राराक्षस'च्या द. ग. गोडसे यांनी कागदावर केलेल्या डिझाइन्सबद्दल लिहिताना वापरलेला 'अंगवस्त्र' हा शब्द मात्र खटकतो. तो चुकीने वापरला गेला आहे. (पृ. २५१) 'मुद्राराक्षस'च्या वेळी Friends of the people - 'लोकमित्र' हा जर्मन सरकारच्या सांस्कृतिक क्षेत्रातला अत्युच्च सन्मान विजयाबाईंना मिळाला. तो मिळविणारी विजया मेहता ही पहिलीच स्त्री आणि दुसरी आशियाई नागरिक. त्यावेळी त्यांना गांधीजींच्या ओळी आठवल्या–

Let my hut be roofed firmly on my soil
Let the doors and windows be open
So that winds from far away lands
breeze through my hut (पृ. २६३)

या ओळी गांधीजींच्या? की त्यांनी कुठे उद्धृत केलेल्या ते कळत नाही, तसेच शेवटच्या दोन ओळींचा अनुवादही सैल आहे. तो असा हवा- 'म्हणजे मग दूरवरच्या भूप्रदेशातील वाऱ्याच्या हळुवार झुळुका माझ्या झोपडीत येतील.'

विजयाबाईंनी 'फसलेली नाटकं' हेही एक प्रकरण लिहिले आहे. नाटकासंबंधीचा सतत सूक्ष्म विचार, स्वत:ला तपासत राहाणे, चुका मान्य करणे; आणि पुढे जात राहाणे हे सतत घडत आलेले दिसते. विजयाबाईंची निष्ठा, अविश्रांत परिश्रम, प्रयोगशीलता, अभ्यासू वृत्ती आणि त्यांच्यातले जातिवंत कलागुण या साऱ्याचा सहजप्रत्यय या लेखनातून येतो. त्यांची रंगभूमीवरची प्रतिमा दीर्घ कारकीर्द लखखपणे डोळ्यांपुढे उभी राहाते.

पीटर ब्रुक यांच्या महाभारताचे, अतिशय सुरेख व विस्तृत, वर्णन त्यांनी केले आहे. त्यातील सूक्ष्मता व बारकावे, त्यांच्या मर्मदृष्टीची साक्ष देतात.

बॅरिस्टर, संध्याछाया, महासागर, हमीदाबाईची कोठी, पुरुष, जास्वंदी, अखेरचा सवाल, एक शून्य बाजीराव इ. विजयाबाईंची महत्त्वाची नाटके. या नाटकांचे प्रयोग कसे उभे राहिले, त्यामागे किती अभ्यास, किती परिश्रम होते, कोणते नावीन्य होते, कोणती आव्हाने होती; या साऱ्याविषयी त्यांनी सुरेख विवेचन केलेले आहे.

नाटकातील काही पारिभाषिक संज्ञाही त्या जाता जाता स्पष्ट करतात. उदा. इम्प्रोव्हायझेशन, ब्लॉकिंग, स्टेनिस्लावस्कीचे भावनिक स्मृतींचे तत्त्व, बॉडी इमेज, स्टेज बिझिनेस इ.

चित्रपट, दूरदर्शन या क्षेत्रातही त्यांनी काम केले. नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान त्यांना मिळाला. एक कलासंपन्न, रसरशीत आयुष्य विजयाबाई जगल्या. यश-अपयश, सुख-दु:ख, सारं काही पचवून त्या उमेदीने, ताकदीने उभ्या राहिल्या. रंगभूमी हा त्यांचा श्वास आणि ध्यास आहे; हे 'झिम्मा'तील शब्दाशब्दातून दिसतं.

एका प्रगल्भ, चिंतनशील कलावतीने लिहिलेलं, संयतसुंदर आत्मचरित्र म्हणजे 'झिम्मा'!

◇◇◇

**झिम्मा- विजया मेहता**
राजहंस प्रकाशन,
*पृष्ठे :* ४४०, *मूल्य :* रु. ३७५/-
*प्र. आ. :* ४ नोव्हें. २०१२

**डॉ. मेघा सिधये**
मो.: ८५५१०१८७७२



अनुक्रमणिका

### अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाच्या

## नवनिश्चित पदाधिकाऱ्यांना शुभेच्छा व अभिनंदन!



माधवी वैद्य



मिलिंद जोशी



सुनील महाजन

अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ आता ह्या वर्षापासून पुढील तीन वर्षे (इ. स. २०१३-१४ ते २०१५-१६) महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथे आले आहे. परिषदेच्या घटनेतील प्रथेनुसार पुण्याचे पदाधिकारी कार्याध्यक्ष, प्रमुख कार्यवाह आणि कोषाध्यक्ष हे महामंडळाचे अध्यक्ष, कार्यवाह आणि कोषाध्यक्ष होतात. त्यानुसार महामंडळाचे अध्यक्षपद परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, ह्यांच्याकडे आले असून कार्यवाह म्हणून प्रा. मिलिंद जोशी आणि कोषाध्यक्षपदी श्री. सुनील महाजन असे महामंडळाचे पदाधिकारी निश्चित करण्यात आले आहेत.

अध्यक्षपद स्वीकारल्याबरोबर परिषदेच्या धडाडीच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी दैनिक 'सकाळ'शी संवाद करताना, महामंडळाला आणि साहित्यरसिकांना सतावणाऱ्या दोन प्रश्नांबाबत महत्त्वपूर्ण प्रतिक्रिया त्यांनी व्यक्त केल्या. नेहमीच्या त्याच-त्या पद्धतीने साहित्यसंमेलन न घेता संमेलनाची पद्धतच बदलणार असल्याचे त्यांनी जाहीर केले. तसेच संमेलनाध्यक्षपदासाठी होणारी सध्याची 'पोस्टल बॅलट'ने होणारी निवडणूक थांबविणे; हा दुसरा महत्त्वाचा बदल त्या करणार आहेत. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी ह्यांनी निवडणूक पद्धतीत टप्प्या-टप्प्याने बदल केला जाईल असे जाहीर करून संमेलनाच्या प्रक्रियेत मात्र लगेचच बदल करून अधिकाधिक तरुणाईला आणि ग्रामीण भागाला मुख्य प्रवाहात आणण्याचे धोरण स्वीकारले जाईल; असे जाहीर केले आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे ह्या तिघांचे मन:पूर्वक अभिनंदन! त्यांनी अंगिकारलेल्या कार्याला हार्दिक शुभेच्छा!!

**संपादक**

महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, पुणे ३०.



अनुक्रमणिका

## विंदा करंदीकरांचे आततायी अभंग

– वैशाली मधुकर जाधव

*[मंदिरांची उंचच उंच गोपुरे आध्यात्मिक उन्नतीची साक्ष देतात. जसजसे दैन्य-दारिद्र्य, भ्रष्टाचार आणि अनीती वाढते आहे; तसतसे मंदिरांचे भौतिक वैभव सोने-चांदी-हिरे-माणिक-मोती ह्यांनी झळाळून नेत्रदीपक होत चालले आहे. सोन्याच्या कळसाभोवती आणि हिरेजडित मुकुट परिधान केलेल्या देवाचे भय वाढत आहे. सर्वांचा रक्षणकर्ता म्हणून सिंहासनाधिष्ठित देवाला मंत्र्यांप्रमाणे अंगरक्षकाची गरज भासू लागली आहे. अशावेळी तुकोबाने कोणते अभंग लिहिले असते? रादासांनी मनाला कसे समजाविले असते? ह्या पोटतिडकीने लिहिलेल्या अभंगांनी नकळत 'विरुपिके'चे रूप घेतले. त्याचेच हे सिंहावलोकन. –संपादक]*

मराठी काव्यातील ओवी आणि अभंग हे सर्वात जुने व परंपरेने चालत आलेल्या लोकप्रिय रचना आहेत. मराठी वाङ्मयनिर्मितीच्या आधीपासून ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इ. संतांनी आपली कविता मुख्यत: अभंगबद्ध केल्या आहेत. ज्ञानेश्वरांनी दाखविलेले ईश्वराचे अतींद्रियरूप अभंगातून दाखविले आहे. आजच्या आधुनिक युगातील कवींनाही आपल्या भावनाविष्कारासाठी आणि मानवी जीवनमूल्यांचा शोध घेण्यासाठी तो जवळचा वाटतो.

### विंदा करंदीकरांची अभंगाविषयीची भूमिका

संत परंपरेपासून आजच्या आधुनिक काळापर्यंत काव्यामध्ये आशय व आविष्कार पद्धतीत बदल झाले. पण परंपरागत सर्वच खुणा पुसल्या गेल्या नाहीत. या आधुनिकतेचा म्हणजे नवतेचा व परंपरांचा मूलगामी विचार विंदा करंदीकरांनी आपल्या 'परंपरा व नवता' या समीक्षा ग्रंथात केला आहे. परंपरा व नवता या संदर्भात ते म्हणतात, 'परंपरा या कल्पनेच्या संदर्भातच नवतेचे मूलस्वरूप सुस्पष्ट होऊ शकते. ज्यावेळी अशा स्वरूपाची नवता प्रकट होते. तेव्हा प्रत्यक्ष जरी तिचे कार्य वर्तमानकाळापुरतेच मर्यादित दिसले तरी अप्रत्यक्षपणे ती परंपरेतील सर्व संवादी स्वरांना जागृत करीत असते आणि हे असे होते याचे कारण अशा नवतेच्या भावी अस्तित्वाची शक्यता परंपरेतील संवादी स्वरात अगोदरच अंतर्भूत झालेली असते. परंपरांतर्गत घटकांच्या मूल्यमापनात बदल घडवून आणणारा व आपले विशिष्ट ऐतिहासिक कार्य संपत असतानाच परंपरेशी एकरूप होऊन तिला समृद्ध करणारा अनिवार्य उन्मेष म्हणजे नवता.'[१] अशा या 'अभंग' या काव्यप्रकाराचे वर्तमानकाळापुरते म्हणजे फक्त संतकाव्यापुरते तिचे कार्य मर्यादित न राहता परंपरेशी एकरूप होऊन तिला आधुनिक काळातही नवा आशय सांगणारा व परंपरेला समृद्ध करणारा हा काव्यप्रकार अनिवार्यपणे नवतेचा उन्मेष ठरला आहे.

### आधुनिक मराठी काव्यातील नव्या जाणिवा व्यक्त करणारे अभंग लेखन

पारंपरिक अभंगातून ईश्वराविषयीची ओढ, भक्ती, आत्माविष्कार व्यक्त झाला आहे. तुकारामांनी आपल्या अभंगातून समाजातील दंभावर, ढोंगी अंधश्रद्धा यावर टीका केली आहे. तरी या काळातील अभंगाचे स्वरूप प्रामुख्याने ईश्वरभक्तीचे होते; पण आधुनिक कवींनी या देशी पारंपरिक अभंग रचनेचा वापर बदललेल्या समाजस्थितीचे म्हणजेच अध्यात्माबरोबरच सामाजिक जाणीव व्यक्त करण्यासाठी केला आहे. आधुनिक कवींमध्ये १९३५ साली माधव जूलियन यांनी 'फटकळ अभंगा'ची रचना केली आहे. त्यांनी पारंपरिक अभंगरचनेच्या आशयात बदल केला आहे.

म्हणून त्याला 'फटकळ' हे विशेषण वापरले आहे. ते आपल्या अभंगातून देव देव दुसरा कोणी नसून तो माणूसच आहे. माणसातच देव आहे. आपल्या राष्ट्रउभारणीसाठी आपणच देव झाले पाहिजे. 'देव्हारा' या कवितेत ते म्हणतात, 'या देशात तेहतीस कोटी देव आहेत तरीही देवाचा भक्त दीनवाणा आहे.' देवांच्या सेवेसाठी अन्नकोट केले जातात, पण कष्टाळू मात्र उपाशी राहतात. रत्न-सोन्यांच्या राशी देवावर वाहिल्या जातात; पण कष्टकरी माणसाला पांघरावयाला वस्त्रही मिळत नाही. मग देवाचे अस्तित्व कसे मान्य करावे म्हणून कवी म्हणतो, 'तुम्हीच देव व्हा. जे देवाला दिले आहे; ते माणसांना द्या व राष्ट्रउभारणीमध्ये हातभार लावा.'

'देवाची समाधी' या अभंगातही अशाच प्रकारचा अनुभव व्यक्त झालेला आहे. 'जाणून नेणता नाना पूजा भोगी' हे सर्व पाहात असूनही हा परमेश्वर तटस्थपणे पाहातच उभा आहे; आणि आपण ज्याला देवाचा दूत मानला, प्रेषित मानला त्याची अवस्था कशी तर 'प्रेषित काय प्रेषिताचा बाप झाला, आपोआप क्रूसारूढ' असा आतापर्यंतचा देव आहे. पण नवीन युगातील परमेश्वर कसा असेल तर

*'प्रभूचे न होती सुळावरी हाल*
*उत्क्रांती पहाल प्रभूची ही ।*
*असून नसल्यासारखा ईश्वर*
*ध्येयरूपधर स्फूर्तिदाता ।।'* (मधुलहरी, पृ. ४)

देवाविषयीची पारंपरिक विचारसरणी-देव हा तारणारा आहे. ही बदलून माणसातच देव आहे व माणसाची जी दयनीय अवस्था झाली आहे; यातून देव नाही तर माणूस माणसाची सुटका करू शकतो. संतांच्या अभंगवाणीत ईश्वरभक्ती, त्याच्यावरचा विश्वास दिसून येतो. आजच्या आधुनिक युगातील माणसाला ईश्वराच्या अस्तित्वाविषयी साशंकता वाटू लागते. देवाविषयीच्या संकल्पना बदललेल्या दिसतात. संतांनी आपल्या अभंगातून ईश्वर व समाजजीवन यांचे दर्शन घडविले तसे माधव ज्यूलियन यांनी आपल्या 'फटकळ' अभंगातून ईश्वराच्या अस्तित्वाविषयी प्रश्नचिन्ह उभे केले.

माधव ज्युलियन यांच्यानंतर 'मनमोहन' यांनी अभंग हा रचनाप्रकार वापरला आहे. यात त्यांनी कवींना व काव्याला आलेली हलाखीची स्थिती मांडली आहे. मनमोहन यांनी आपल्या 'शंखध्वनी' या अभंगात कवींविषयीची खंत प्रकट केली आहे, पण ती विनोदी ढंगाने.

मनमोहन यांच्यानंतर 'गोविंदाग्रजांनी' 'अनामिकाचे अभंग' या नावाने रचना केल्या आहेत. हे आधुनिक काळातील अभंग असले तरी येथे मात्र त्यांना पारंपरिक भक्तीच अभिप्रेत आहे. मराठीचिये नगरीत पंढरीला व चंद्रभागातटीला अतिशय महत्त्व आहे. तिथे गेल्यानंतर नावाचा व 'मी'पणाचा नाश होतो. तेथे सर्व वैष्णवजन समरूप होतात. तिथे नावाचा अभिमान व्यर्थ आहे. त्यासाठी ते म्हणतात, 'दयेची भीक मागणाऱ्या भिकाऱ्याला व 'मी'पण गळलेल्या भक्ताला नावाचे महत्त्व नाही.' या आशयाचे हे 'अनामिकाचे अभंग' आहेत. पारंपरिक स्वरूपातच गडकऱ्यांच्या अनुभूती या अभंगातून व्यक्त झाल्या आहेत.

गोविंदाग्रजांनंतर नवसाहित्याचे जनक मानल्या गेलेल्या बा. सी. मर्ढेकरांनीही अभंगाचा उपयोग केला आहे. त्यांनी आपल्या अभंगाला 'नाठाळाचे अभंग' असे म्हटले आहे. म्हणजे अर्थातच यात उपरोध किंवा पारंपरिकतेला छेद दिलेला दिसून येतो. प्रथम त्यांच्या अभंगातून परमेश्वर किंवा तशाच एखाद्या आधिभौतिक शक्तीवर विश्वास असल्याचे दिसून येते.

मर्ढेकरांनी तुकोबांच्या अभंगातील अनुभूती व जाणीव वेगळ्या शब्दात मांडली आहे. 'तीच गिरमिटे नवीन वळसे' या अभंगात ते म्हणतात,

*'काय मांगावे परी म्यां*
*तू हि कैसा काय द्यावे*
*तूच देणारा जिथे अन्*
*तूच घेणारा स्वभावे'* (मर्ढेकरांची कविता, पृ. ७३)



अनुक्रमणिका

या अभंगातून सनातन अद्वैतकल्पनेचा पुरस्कार होत असला तरी 'राव सांगता देव कुणाला' यासारख्या कवितेतून या कल्पनेवरचाही विश्वास उडालेला दिसतो. कारण १९३९ ते १९४७ हा कालखंड जगाच्या आणि भारताच्या दृष्टीने कठीण असा काळ होता. युद्धजन्य स्थिती, भांडवलशाही, यंत्रयुगीन समाज, महानगर आणि मध्यमवर्गीयांचे किरटे जीवन असे वास्तवाचे पैलू, ढासळलेली अंत:सृष्टी, नीतीमूल्यांची घसरण, अविवेक, श्रद्धानिष्ठांची फरपट या सर्वांमुळे संतप्त पण निराशा या 'नाठाळांच्या अभंगा'तून उपरोधपूर्ण रीतीने आविष्कृत झाली आहे. या उपरोधपूर्ण अभंगातून त्यांची समाजाविषयी, माणसाविषयीची आंतरिक तळमळ दिसून येते.

**विंदा करंदीकरांचे आततायी अभंग**

मर्ढेकरांनंतर 'विंदा करंदीकर' हे अशा प्रकारचे काव्यलेखन करणारे कवी आहेत. त्यांच्याच 'आततायी अभंगा'चा आपल्याला विचार करावयाचा आहे. त्यांनी आपल्या 'धृपद' (१९५९) या कवितासंग्रहात अशा प्रकारचे एकोणतीस अभंग लिहिले आहेत. या आततायी अभंगाविषयी मंगेश पाडगावकर म्हणतात, 'अभंग हा संतांनी मराठी कवितेला दिलेला फार मोठा ठेवा आहे. ईश्वराची ओढ, सृष्टीच्या भौतिक रचनेविषयीचे ज्ञान, जीवनाच्या स्वरूपाविषयीचे चिंतन, आत्मद्रोह करणाऱ्या समाजावर ओढलेले कोरडे, आत्मसाक्षात्कार हे संतांच्या अभंगातून व्यक्त होणारे मूलभूत अनुभव आहेत. करंदीकरांच्या आततायी अभंगातून व्यक्त होणारे अनुभव याच प्रकारचे आहेत. ईश्वराशी संवाद करीत असताना संत कृत्रिम उपचाराचा आडपडदा ठेवीत नाहीत. भक्त आणि ईश्वर यांच्यात ही कृत्रिमता हवीच कशाला? याच जाणिवेने करंदीकरांनी या अभंगांना 'आततायी' हे विशेषण जोडले आहे. जे मनात आहे ते खोट्या उपचारांचा आडपडदा न ठेवता, प्रसंगी फटकळपणा पत्करूनही करंदीकरांना व्यक्त करायचे आहे. हे अभंग लिहिताना करंदीकर अनेक वेळा संतांच्या अभंगाचे सूर वाचकांच्या मनात निर्माण करतात; आणि या स्वरांशी विरोधी असलेले आधुनिक जीवनाचे सूर त्यांच्या बाजूला ठेवतात. या विरोधामुळे करंदीकरांना अभिप्रेत असलेला सामाजिक उपहास अधिक तीव्र होतो.'[२]

व्यक्तिगत भावजीवनापासून सामाजिक वास्तवापर्यंत तसेच सामाजिक भाव, विज्ञाननिष्ठा आणि आध्यात्मिक कुतूहल यांचा संगम त्यांच्या काव्यात आहे. चिंतनशील पिंडामुळे विश्वरहस्याचा शोध, हेही त्यांच्या काव्यातील एक केंद्रवर्ती सूत्र आहे. अपारंपरिक पद्धतीने हा शोध त्यांच्या कवितांमधून दिसतो. प्रयोगशीलता हे करंदीकरांच्या काव्याचे ठळक वैशिष्ट्य आहे. गझलगीत, मुक्तसुनीत, तालचित्रे, विरूपिका, आततायी अभंग असे नवे-जुने घाट त्यांनी स्वीकारले. 'स्वच्छंद' हा नवा छंदही त्यांनी घडविला. विंदा करंदीकरांच्या कवितेत नाट्यपूर्ण शैली आढळते. विनोद आणि कारुण्य, क्षुद्र आणि उदात्त यांचा मेळ साधण्याची धाटणी, विपरीत कल्पनाशक्ती आणि मनोविश्लेषण हे त्यांच्या अभिव्यक्तीचे विशेष. अभिव्यक्तीच्या सामर्थ्यशाली भाषेच्या अंगभूत मर्यादा ओलांडण्याची, तिच्यातील सर्जक सामर्थ्य शोधण्याची धडपड ते करतात. संगीत-चित्रकलादी कलांचे संस्कार, इंग्रजी, मराठी काव्यपरंपरेचा व्यासंग आणि प्रवास यामुळे त्यांच्या काव्यगत व्यक्तिमत्त्वाला अनेक पैलू पडलेले दिसतात. विंदा करंदीकरांची प्रतिमासृष्टी वैविध्यपूर्ण व संपन्न आहे.

नवकाव्याच्या कालखंडाच्या पूर्वार्धात मराठी साहित्यावर कार्ल मार्क्स, सिग्मंड फ्राईड आणि महात्मा गांधी यांच्या विचारसरणींचा प्रभाव दिसतो. खेड्यातून शहराकडे धाव घेणारा मजूर, कामकरी यामुळे नवा समाज अस्तित्वात येऊन कामगार-



अनुक्रमणिका

जगताचे चित्र बदलले. विज्ञानाची संहारक शक्ती, यंत्रयुग, संयुक्त महाराष्ट्राची चळवळ, कामगार लढे, आंदोलने यांत काही कवी सामील झाले, त्यात करंदीकरही अपवाद नव्हते. प्रारंभी सावरकरांच्या विचारसरणीने भारावलेले करंदीकर पुढे मार्क्सवादाकडे आकृष्ट झाले. त्यांच्या सुरुवातीच्या अनेक कवितांवर मार्क्सवादाचा प्रभाव जाणवतो.

*'लाल आलिंगनी । दु:खे लाल नवी ।*
*त्याची चिंता हवी । पुढच्यांना'* (धृपद पृ. १०४)

या अभंगातील ओळी मार्क्सवादाचाच जयघोष करतात.

### अ) सामाजिक जाणिवा

आपल्या 'परंपरा आणि नवता' या समीक्षाग्रंथात 'काव्य आणि सामाजिक जाणीव' या लेखात ते म्हणतात, 'काव्यामधील सामाजिक जाणिवेचा विचार करताना आपल्याला मुख्यत: व्यक्ती आणि समाज यातील संबंधांची काव्यामध्ये अभिव्यक्त होणारी प्रकट किंवा सुप्त जाणीवच अभिप्रेत असते. ज्या काव्यामध्ये व्यक्ती आणि समाज यांच्यामधील या अतूट संबंधाचा, त्यांच्या परस्परावलंबित्वाचा आणि त्यांच्या मूलभूत व तर्कातीत जीवैक्याचा साक्षात्कार होतो; ते काव्य मी सामाजिक जाणिवेचे काव्य म्हणून ओळखतो. ज्ञानेश्वरांनी मागितलेले पसायदान तुकारामाने केलेला उपहासगर्भ दंभस्फोट आणि रामदासांनी घडविलेले समाजदर्शन या सर्वांमध्ये अशा प्रकारची सामाजिक जाणीव अंतर्भूत आहे. संतकाव्याचा वारसा पाठीशी घेऊनच अर्वाचीन मराठी काव्यात ती पुन्हा प्रकट होऊ लागली.'[३]

हाच वारसा घेऊन विंदा करंदीकरांनी आपल्या आततायी अभंगातून वैश्विक सत्य (अध्यात्माचे अंतिम सत्य), विज्ञाननिष्ठा, भांडवलशाही समाजव्यवस्था अशा सर्व विचारदृष्टींचा शुद्ध तर्ककर्कश तत्त्वचिंतनाद्वारे विचार आपल्या आततायी अभंगात केला आहे. माणूस या विज्ञानयुगात पूर्णपणे बदललेला आहे. पण त्याला आपला मूळ संस्कार सोडता येत नाही. म्हणून 'वाजविता वाळा । मिठी घाल ॥' या अभंगात ईश्वर, परमेश्वर, धर्म, संकेत, अनिष्ठ रूढी यांवर माझा विश्वास नाही असे दाखविणाऱ्या पण देऊळ दिसताच नकळत मान खाली वाकविणाऱ्या परंपरानिष्ठ मानवाचे, त्याने केलेल्या बहाण्याचे, वर्णन करताना म्हणतात,

*'सांगतो तयांना । ठेच गा लागली*
*म्हणोनी वाकली । खाली मान'* (धृपद पृ. ९६)

परंतु अशांना मनातून मात्र अनंताची ओढ असते, या विचारापासून त्याला लांब जाता येत नाही. म्हणून कवी म्हणतो,

*'चोरटे हे प्रेम । चोरटा हा चाळा*
*वाजविता वाळा । मिठी घाल ।'* (धृपद पृ. ९६)

करंदीकरांचे काव्य, अभंगातून केलेले तत्त्वचिंतन हे आशावादी आहे असे म्हणण्यापेक्षा अभ्यासू आहे, संशोधक प्रवृत्तीचे आहे. अंतिम साध्याच्या संदर्भात येणाऱ्या नवीन नवीन शक्यता तपासून पाहणारे, त्यासाठी होकारात्मक व नकारात्मक विचार-पद्धतीने मांडणी करीत, प्रसंगी एकमेकांना छेद देऊन नवीन शक्यता सुचविणारे आहे. त्यांच्या अभंगात उपरोधही येतो. पण केवळ औपरोधिक मांडणीतून वास्तवदर्शन घडवून करंदीकर थांबत नाहीत. सत्य, शिव, सुंदरावर नुसता विश्वास न ठेवता अंतिम सत्याच्या शोधात निरनिराळ्या मार्गांनी प्रवास करताना ते दिसतात. येथे सृजनात्मक विचारांची मांडणी येते. यादृष्टीने नवीन काळातील, समाजातील प्रश्नांचा शोध घेणारे व उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करणारे तात्त्विक स्वरूपाचे चिंतन म्हणजे करंदीकरांचे आततायी अभंग.

**आ) मूर्तिभंजन**

मूर्तिभंजन हा त्यातीलच एक विचार. मूर्तिभंजन हे कोणाचे, तर देवळातून सगुण साकार देवाची पूजा व भक्ती केली जाते त्या देवाचे. याच्या नावाखाली धर्माचे ठेकेदार सामान्य जनतेला लुबाडत असतात. ही बडवेगिरी व्यापारातील परमेश्वराची भागीदारी करंदीकरांना मान्य नाही. सत्याच्या शोधात जाणवणारे मांगल्य, पावित्र्य ते मान्य करतात. परमेश्वर हा चराचर सृष्टीत प्राणिमात्रांत आहे. सृष्टीमध्ये परमेश्वर पाहतात. धर्म ही समाजाच्या पायात अडकविलेली बेडी आहे. (मार्क्सने याचा उल्लेख संदर्भ गळून अफूची गोळी असा केला आहे.) धर्म, देव यामुळे मानवाच्या मनात संकुचितता निर्माण होते. परिणामी समाजाची, देशाची आणि मानवतेची अधोगती होती. माणसांची मने विशाल होण्याऐवजी संकुचित होतात. म्हणून अशा सगुण साकार मानवनिर्मित देवाचे मूर्तिभंजन त्यांच्या अभंगातून व्यक्त होते. कारण 'मूर्तीच्या माघारी । मुर्दाड दडले.' मूर्ती/देवाच्या नावाखाली समाजाची लुबाडणूक होते म्हणून या देवरूपी फत्तरांना फोडले पाहिजे.

विंदा करंदीकरांच्या मनात समाजातील लोकांचे दुःख, दारिद्र्य, दैन्य पाहून प्रश्न उभा राहतो, समाजामध्ये एवढे दुःख, दैन्य, ऐहिक सुखासाठी लाचारी व अगतिकता यामुळे सामान्य माणसाची होणारी होरपळ पाहून सर्वांचा कर्ता-करविता सृष्टीचा निर्माता जो विठ्ठल आहे तो शांत कसा? म्हणून ते त्याचा धावा करतात आणि त्याला म्हणतात, माझ्या पोटी भूक आहे, तुझ्या पोटी माया आहे. भक्तांचा कळवळा व विशुद्ध प्रेम ही परमेश्वराची प्रमुख लक्षणे आहेत. तरी आम्ही भुकेने सैरावैरा धावू लागलो आहोत. तेव्हा तुझे देवपण दाखव, नाहीतर, तुझे अस्तित्व आम्ही मान्य करणार नाही. म्हणून ते म्हणतात,

*'ऊठ ऊठ विठ्या । दाव देवपण*
*नाहीतर घण । तुझ्या माथी ।।'* (धृपद पृ. १०२)

समाजातील दुःख, दैन्य पाहून करंदीकरांच्या मनाला वेदना होतात. म्हणून ते संतांप्रमाणे देवाशी आपल्या समाजबांधवांसाठी झगडा करतात आणि त्याचबरोबर देव आहे-नाही या शक्यताही तपासून पाहतात.

परमेश्वराचे अस्तित्व नाकारत असताना ज्या शक्याशक्यता करंदीकर तपासून बघतात त्यात आणखी एक मुद्दा येतो– अद्वैताचा! जो आजपर्यंत भारतीय तत्त्वज्ञानात, उपनिषदांमध्ये मांडला आहे. ज्ञानेश्वरांनी परमात्म्याचे परमात्मा, अंतिम सत्य, ब्रह्म, इहलोकीच्या चांगल्या-वाईट सर्व गोष्टींना तोच जबाबदार. मग जे जे माझे मानले व त्यासाठी जीवाचा आटापिटा केला त्याचे सार काय? माझा जन्म, हे शरीर, मृत्यूसुद्धा सगळी तुझीच निर्मिती.

*'ज्याने केले पुण्य । त्याने केले पाप,*
*दोघांचाही बाप । तूच तूच,*
*ज्याने द्यावा जन्म । त्याने मृत्यू द्यावा,*
*काय तुझा कावा । तुला ठावे'* (धृपद पृ. १०३)

शेवटी करंदीकर म्हणतात..

*'बरे केले देवा । सुटला हा पाश,*
*होता सर्वनाश । नाश नोहे?'* (धृपद पृ. १०३)

अद्वैत सिद्धान्तामध्ये ऐहिकतेला काही अर्थ नाही कारण सत्य अविनाशी ब्रह्म हे स्थूल जाणिवेच्या पातळीवर अनुभवता येणारे नाही. पण हे अगदी मान्य केले तरी त्यांचा दुसरा प्रश्न येतो.

*'महारोग्यापोटी । पोरांची खिल्लारे*
*जीवन तया रे । देतो कोण?'* (धृपद पृ. ११४)

मंगेश पाडगावकर म्हणतात, "सत्याचा शोध घेण्याची अनिवार ओढ ही करंदीकरांच्या प्रतिभेची प्रकृती असल्यामुळे करंदीकरांची जीवनविषयक जाणीव त्यांच्या सामाजिक-राजकीय विचारांनी व निष्ठांनी



अनुक्रमणिका

मर्यादित होत नाही. करंदीकरांच्या कवितेतून जाणवणाऱ्या चिंतनशीलतेचे ते महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. सतत जाणवणाऱ्या नवनव्या सत्यांच्या संदर्भात करंदीकर जुन्या निष्ठा उलटसुलट करून तपासून पाहतात.''४ करंदीकर देवाचे अस्तित्व आंधळेपणाने मान्य करीत नाहीत.

'सज्जनाचे बळ । पायामध्ये लुळे' (धृपद पृ. ११२) या अभंगात 'भले द्यावी कासेची लंगोटी' ही तुकारामांच्या अभंगातील ओळ करंदीकर जशीच्या तशी घेतात, पण नाठाळाचे माथी हाणू काठी या तुकारामांच्या पुढील ओळीऐवजी 'नाठाळाची चुकवावी काठी' असे नेमके परस्परविरोधी विडंबनात्मक विधान करून आजच्या कातडीबचाऊ जगाचे दर्शन घडवितात. आजच्या जगात संतत्वाच्या गोष्टी म्हणजे या मूल्यहीन जगात निव्वळ बुळेपणा अशा स्वरूपाच्या वाटतात. तरीही माणसाला कशाचा तरी आधार हवा असतो. म्हणून सामान्य माणूस परमेश्वराची कल्पना करतो व त्याच्यावर आपला भार टाकतो. 'अगा कृपावंता आवर हे दान' (धृपद पृ. ११६) या अभंगात ते सांगतात, हे पारलौकिक दान सामान्य माणसाला परवडणारे नाही कारण याची वाट अवघड आहे आणि माणूस या वाटेला लागला तर तो लौकिक जगाचा राहात नाही. अद्वैत त्याला सापडत नाही. म्हणजे अंधारात चाचपडण्यासारखी त्याची अवस्था होते. 'रितेपण माझे चघळते रेती' अशा अनुरूप प्रतिमेद्वारे हा अनुभव विंदा करंदीकरांनी मांडला आहे. म्हणून शेवटी ते म्हणतात, 'टाक ते निदान। दुःख माझे लौकिक आणि अलौकिक, हे दोन्ही हातातून जाण्यापेक्षा तुझे दान आवर' अशी भावना व्यक्त करतात.

'सद्‌गुरूची मेख । सुवर्णाची' (धृपद पृ. ११२) या अभंगातून विंदा करंदीकर भूदेवांविषयी सांगतात. आमचे भूदेव कसे आहेत तर 'सकाळी उठोनी । निजवावे मन' हे शरीराने उठतात पण मनाला निजवून म्हणजे दिवसभर लाच, निंदा, अपप्रकार करून आपली बँक भरावी. आपल्या फायद्यासाठी दुसऱ्यांचा आदर करावा, देव त्याला मानावे जो देणारा आहे, अशा बदललेल्या माणसाचे वर्णन ते आपल्या अभंगात करतात. आजचा देव आणि संत यांची संकल्पना बदललेली दिसते. आजच्या संतांना संतपणच कळलेले नाही. सत्याची वाट सोडलेले संत आणि भाट तिठ्यातिठ्यावर भेटतात. या संतांचे तत्त्वज्ञान काय तर सत्तेपुढे सात्त्विका सांगणे नाही, नागड्यांसाठी निस्संगाचे महत्त्व, उपाशांना उपासाचे महत्त्व असे हे आजच्या वेदांचे तत्त्वज्ञान आहे. आजचा देव खिशामध्ये हात घालून उभा आहे. आपल्या राष्ट्राला एवढी महान अध्यात्माची बैठक असूनही आज आपल्या राष्ट्राची अशी दयनीय स्थिती का झाली? आपला देव शांतपणे बघत असा उभा का? यालाही या युगाची बाधा झाली आहे का? असा विचार विंदा करंदीकरांच्या मनात निर्माण होतो.

### इ) कार्ल मार्क्सच्या विचारांचा प्रभाव

आपल्या आध्यात्मिक बैठकीचा ऐहिक पातळीवर विचारवंतांनी पुनर्विचार केलेला दिसतो आणि तोही पाश्चात्त्य शिक्षणाने मिळालेल्या दृष्टीने. अध्यात्माने निर्माण केलेले धर्म, परंपरा बदलत्या समाजाच्या गृहीतांनुसार बदलायला हव्यात. धर्माच्या परंपरांच्या नावाखाली होणारे शोषण व आधुनिक जगाचे अपत्य असलेले यंत्रयुग–या यंत्रयुगात कामगार व भांडवलदार वर्ग असे जे वर्ग निर्माण झाले व त्यातून कामगार वर्गाचे होणारे शोषण प्रथम कार्ल मार्क्सने मांडले व या मार्क्सच्या विचारसरणीने प्रभावित झालेले विंदा करंदीकर आपले तत्त्वज्ञान अभंग या छंदातून व्यक्त करतात. ते म्हणतात, आज आम्ही 'विष्णुदास' नाही

तर 'द्रव्यदास' झालो आहोत. आम्हाला आज आनंद मिळतो तो देवाच्या नामस्मरणाने नाही; तर आमचा बँक बॅलन्स वाढल्याने आणि तो कसा वाढवतो, तर गरीबांचे, कामगारांचे शोषण करून.

मूळ अभंगाच्या माध्यमातून आजच्या परिस्थितीवर विडंबनात्मक भाष्य आले आहे. आपल्या संतांनी सामान्यांच्या उत्थानासाठी आपला देह, वाणी झिजवली. समर्थांनी सत्याचे स्वप्न पाहिले. पण आजचे भांडवलशाही लोक सामान्यांच्या कष्टावरती स्वत:चा आर्थिक फायदा करून घेतात. त्यांच्या कष्टाचा योग्य मोबदलाही दिला जात नाही. भांडवलदार वर्ग कामगारांचे रक्त शोषत आहे हे दाखवून देतात.

'मानवांचे सारे ॥ माकडांच्या हाती ।'

(धृपद पृ. ११३)

या अभंगात श्रमजीवी माणूस जो खऱ्या अर्थाने जगाचा पोशिंदा आहे तो भुकेने भाजला जातो आहे आणि उत्पादनाची दलाली करणारे भांडवलदार माजत आहेत.

या भांडवलशाही समाजातील कटू वास्तवाचा उल्लेख करून विंदा करंदीकर म्हणतात, 'संस्कृतीला झाला । नफ्याचा उदर.' नफ्याचा जलोदर झालेल्या या समाजात नागड्यांना न्याय मिळत नाही. मानवाचे शोषण करणारीही माकडे सत्ताधीश बनतात. श्रमिक उपाशी मरतो आणि साठेबाज व्यापाऱ्यांची गोडाऊने अन्नधान्य गिळून टाकतात. शोषितांनी केलेली क्रांती हेच या कुजलेल्या समाजाला उत्तर.

*'नागड्यांनो उठा । उगवारे सूड,*

*देहचीच चूड । पेटवोनी'* (धृपद पृ. ११३)

ही क्रांतीची सूचना, शोषण करणारे पशू आहेत ही सूचना 'माकड' या शब्दात आहे. पशुतून माणूस उत्क्रांत झाला, पण पशूच अजून माणसाचे शोषण करतो आहे.

भांडवलदारांच्या आधाराने देशाची सेवा करायला निघालेले, भांडवलदारांप्रमाणेच तथाकथित राजकारणी ईश्वरीमूल्ये व सामान्य माणसांच्या भावनांचा बाजार मांडून त्यांचा उपयोग मतांसाठी करतात व स्वत:ची पोळी भाजतात. मतांसाठी हे लोक देव, धर्म, हुतात्मे, मूल्ये त्याचप्रमाणे अन्न, पैसा यांचीही प्रलोभने दाखवून मते मिळवत असतात. याचे दर्शन 'आधी केली मते । मग केला नर' (धृपद पृ. ११९) या अभंगातून घडवतात.

**ई) विज्ञाननिष्ठा**

विंदा करंदीकर आपल्या अभंगातून विज्ञानाधिष्ठित मुक्तीची संकल्पनाही मांडतात. विज्ञानाच्या मार्गाने किंवा विज्ञानामुळे मानवाची प्रगती होऊ शकते, या गोष्टीवर करंदीकरांचा ठाम विश्वास दिसून येतो.

आपल्या अभंगातून त्यांनी विज्ञाननिर्मित नवीन अध्यात्म तयार करून त्याचा परंपरेशी सांगड घालण्याचा प्रयत्न केला आहे. हे त्यांच्या 'आता मला कळ सोसवेना' (धृपद पृ. १००) या अभंगातून दिसून येते. यात ते अध्यात्म कल्पनेशी वैज्ञानिक तत्त्वज्ञानाची सांगड घालतात आणि मुक्तीची विज्ञानाधिष्ठित कल्पना मांडतात.

या अभंगात येणारी बाळकृष्णाची प्रतिमा हा पडणारा, रांगणारा, खेळताना मोडतोड करणारा बाळकृष्ण म्हणजे प्रयोगांच्या आधारे एक-एका वैज्ञानिक सत्याला सामोरे जाण्याची ही क्रिया आणि या क्रियेच्या आधारे तू अणूतून विश्व निर्माण केले, त्या अणूच्या साहाय्याने मी तुझ्यापेक्षा मोठा झालो आहे असे त्याला वाटते, पण क्षणभरच. त्याला लगेच जाणीव होते,

'विज्ञानाचा द्रोह । हीच माया' (धृपद पृ. १०५)

कारण बदल हा मानवी जीवनाचा अविभाज्य भाग आहे आणि हा बदल पंचेंद्रियांच्या साहाय्याने होत असतो. त्याचप्रमाणे पंचेंद्रियांच्या साहाय्याने

परमेश्वराची अनुभूतीही घेत असतो आणि ही अनुभूती घेणे सत्य व इंद्रियातीत शाश्वत अनंताचा ध्यास ही माया असा एक नवीन सेंद्रिय विज्ञाननिष्ठ विचार ते मांडतात. तर षड्विकारांमुळे माणसाच्या मनाचा घोडा उधळला आहे आणि त्याला अध्यात्मिक इच्छेची वेसण घालणार आहे. परमेश्वराने निर्माण केलेल्या या जगात मंगल, पवित्र, मानवतेला पोषक असे वातावरण मी विज्ञानाच्या मदतीने करणार आहे. तेव्हा मी या अर्थाने देवापेक्षाही श्रेष्ठ होईन. 'अणूतील विश्वा । दिले मी स्वरूप । विश्व अणूरूप । का न व्हावे?' (धृपद पृ. १०६). विज्ञानाने आण्विक शक्तीच्या जोरावर जगाचे कल्याण केले त्याप्रमाणे संहारही केला आहे. या विज्ञानाच्या व अध्यात्माच्या दोन्ही शक्यतांचा ते विचार करतात.

'सद्गुरूवाचोनी । सापडेल सोय' (धृपद पृ. ९७) या अभंगात आपल्या संस्कृतीप्रमाणे गुरूंना ते श्रेष्ठ मानतात. त्यांना थोरपण देतात. पण त्यांना जगाच्या कल्याणासाठी ज्यांनी वैज्ञानिक शोध लावले. मानवाच्या प्रगतीसाठी प्रयत्न केले अशा गुरूंना ते सद्गुरू मानतात. अशांपुढे नतमस्तक व्हावे; पण समाजातील जे ढोंगी साधू, गुरू आहेत त्यांचे दास होऊ नये, असे करंदीकरांना वाटते.

'येतसे फाटके । कुल्यावरी' (धृपद पृ. १०७) या अभंगात माणूस व्यवहारी जगात जगत असताना खोटे मुखवटे घालून जगत असतो. आत एक व बाहेर एक या पद्धतीने 'मी' हे रूप परमेश्वराचेच कारण केवळ 'सत्व'रूपी जगणे अशक्य होते.

*'बदलाया मला । 'मी'च धडपडे*
*त्याने जाती तडे । आहे त्याला'* (धृपद पृ. ९७)

**३) तत्त्वचिंतन**

विंदा करंदीकरांच्या अभंगातून तत्त्वचिंतनही येते. 'काही केल्या आता । मोक्ष हा टळेना' (धृपद पृ. ९८) या अभंगातून हे तत्त्वचिंतन जाणवते. विंदा करंदीकर विज्ञानवादी आहेत, तसेच ते परमेश्वराचेही अस्तित्व मान्य करतात. कारण विज्ञान अंतिम सत्यांच्या संदर्भात उत्तर द्यायला असमर्थ आहे, पण ईश्वरी अस्तित्वाच्या साहाय्याने या प्रश्नांची चटकन उत्तरे मिळतात. माणसाने पोटासाठी, अन्नासाठी स्थलांतर केले, नवे नवे शोध लावले, त्याची भूक शमल्यावरही त्याला अशांती जाणवते. त्याला अजून ज्ञानलालसेची भूक आहे. जगाची कोडी सोडवण्याची त्याची इच्छा त्याला गप्प बसू देत नाही, तत्त्वज्ञानातील आत्तापर्यंतच्या कोणत्याच विचारधारेने सत्याला सामोरे जाता येत नाही हे जाणवल्यामुळे करंदीकर म्हणतात,

*'अगा क्रियापदा । केव्हा येसी भेटी*
*आयुष्यात दाटी । कृदंतांची'* (धृपद पृ. १२०)

मानवी जीवनातील अपुरेपणाची खंत ते यातून व्यक्त करतात.

शेवटी 'मानवाचे अंती । एक गोत्र' (धृपद पृ. १२२) या अभंगात वर्ण, वंश, धर्म, जाती यांच्या माणसामाणसांत उभ्या केलेल्या भिंती मानवी संस्कृतीला 'वांझ' करून सोडतात. अशी ही वांझ संस्कृती नष्ट होऊन जावो, रक्ता-रक्तातील या भेदांच्या कृत्रिम भिंती कोसळून जगातल्या सर्व मानवांचे एक गोत्र होवो, अशी जाणीव करंदीकरांनी या अभंगात व्यक्त केली आहे. ही नवीन मानवनिष्ठ संस्कृती निर्माण करण्याचे श्रेय भारताला मिळो अशी इच्छा या अभंगात प्रकट होते. 'माझा हिमालय । धरो अंतर्पट, लग्नासाठी भट । वेद द्रष्टा!' (धृपद पृ. १२२)

अशा प्रकारे विंदा करंदीकरांनी आपली सामाजिक जाणीव प्रामुख्याने या आततायी अभंगातून अभिव्यक्त केली आहे आणि उत्तरोत्तर ती वाढतच गेली. ते म्हणतात, 'महाराष्ट्रातील प्रत्येक प्रदेशाने आपल्या अस्मितेला जरूर जपावे; पण त्याचबरोबर अज्ञान,



अनुक्रमणिका

अंधश्रद्धा, धर्मांधता, दारिद्र्य, पिळवणूक व दहशतवाद या समाजाच्या षड्रिपूंशी मुकाबला करताना प्रत्येकाने आवश्यकतेनुसार आपली अस्मिता महाराष्ट्राच्या अस्मितेत, महाराष्ट्राची अस्मिता भारताच्या अस्मितेत व भारताची अस्मिता मानवाच्या जागतिक अस्मितेत विलीन करण्याची किमया आत्मसात करणे हेही फार जरूरीचे आहे.'[५] विंदा करंदीकरांनी आपल्या आततायी अभंगातून जी सामाजिक जाणीव व्यक्त केली आहे तीच जाणीव ते आपल्या भाषणातून व्यक्त करतात हे दिसून येते.

### ऊ) वाङ्मयीन विशेष

विंदा करंदीकरांनी आपल्या आततायी अभंगातून प्रामुख्याने सामाजिक जाणिवा व्यक्त केल्या आहेत. त्यासाठी त्यांनी विडंबन, उपरोध यांचा वापर केलेला दिसतो. ''घ्यावे सर्व नाणे । वाजवोनी' (धृपद पृ. १११) या अभंगात 'आम्ही द्रव्यदास' मनाचे मवाळ देतसे गोपाळ । दूध लोणी' अशा विडंबनाच्या योगे भांडवलशाहीचे बुरखे फाडण्याचे काम केले आहे.

प्रतिमांचा वापरही वैशिष्ट्यपूर्ण केला आहे. 'आता मला कळ सोसवेना' (धृपद पृ. १००) या अभंगामध्ये विज्ञानामध्ये केले जाणारे प्रयोग व या प्रयोगाच्या आधारेच एक-एका टप्प्यांवरून अंतिम सत्य शोधिले जाते. याला रांगणारा, पडणारा, रडणारा 'बाळकृष्ण' म्हणजे विज्ञानातील शोध (प्रयोगांना)– अध्यात्मातील बाळकृष्णाची प्रतिमा योजली आहे. यातून विज्ञानाधिष्ठित मुक्तीची कल्पना मांडली आहे.

प्रतिमांप्रमाणे प्रतीकांचा वापरही विंदा करंदीकरांनी केला आहे.

*'अगा क्रियापदा । केव्हा येसी भेटी*
*आयुष्यात दाटी । कृदंतांची'* (धृपद पृ. १२०)

या अभंगातून व्याकरणातील प्रतीके वापरून मानवी जीवनातील अपुरेपणा विंदा व्यक्त करतात.

विजया राजाध्यक्ष म्हणतात, ''संपूर्ण जाणिवेने करंदीकरांच्या अखंडपणे स्थित्यंतरातून जाणाऱ्या कवितेत काही चिरस्थायी सूत्रे निर्माण केली आहेत. ती विशिष्ट जाणीव आशयाची नवी क्षेत्रे दाखविते; आणि आविष्कारालाही नवी वळणे देते. तीच करंदीकरांच्या कवितेतील तालचित्र, मुक्तसुनीत आणि विरूपिका या आकृतीबंधाच्या निर्मितीमागची प्रेरणा. नवे निर्माण करत असताना तिने जे जुने परंतु स्वत:त रुजविलेले होते तेही नव्या ढंगाने वापरले, हेही करंदीकरांच्या आततायी अभंगावरून आणि गझलांवरून समजेल.

जुने सुजाणपणे स्वीकारत, कधी ते नव्याशी जुळवून घेत प्रयोगशील राहणे हा या जाणिवेचा स्वभाव आहे. म्हणूनच जुन्याबाबत हट्टी पूर्वग्रह नाहीत आणि नव्याबाबत उतावळा उत्साही नाही. करंदीकरांनी कधीही, केवळ चूष म्हणून प्रयोगासाठी प्रयोग केले नाहीत, ते प्रयोग नेहमीच उत्स्फूर्तपणे अनुववाच्या आंतरिक निकडीतून केले, ही सगळी त्यांच्या जाणिवेची कमाई.

### संदर्भ :


१. करंदीकर विंदा : 'धृपद', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. प्र. आ. १९५९, चौथे पुनर्मुद्रण, २००७
२. करंदीकर गो. वि. : 'परंपरा आणि नवता', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, प्र. आ. १९६७, द्वि. आ. १९८०, पृ. ५
३. (संपा.) पाडगावकर मंगेश : 'संहिता', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्र. आ. १९७५, पृ. ३१
४. करंदीकर गो.वि. : 'परंपरा आणि नवता', पूर्वोक्त, पृ. ४५
५. (संपा.) पाडगावकर मंगेश : 'संहिता', पूर्वोक्त, प्रस्तावना, पृ. ५


◇◇◇


**श्रीमती वैशाली मधुकर जाधव**
२२७४ ए, विसावा, कचरे गल्ली,
इस्लामपूर, ता. वाळवा,
जि. सांगली ४१४५४०९

पुस्तक परिचय

# स्त्रीसुलभ सौंदर्य ल्यालेल्या कविता

– अंजली कुलकर्णी

*[स्वयंपाकघर आणि 'पूर्णब्रह्म' निर्मिणारी 'अन्नपूर्णा' देशकालाच्या बंधना पलीकडील विराट वास्तव आहेत. ज्ञान-वैराग्याच्या वाटेने चालणारा साधकही तिच्यापुढे 'भिक्षांदेही' म्हणून कृपेची याचना करतो. तिचे सम्राज्ञीपद सर्वमान्य आहे.*

*अन्नपूर्णे सदापूर्णे शङ्करप्राणवल्लभे-*

*ज्ञानवैराग्य सिद्ध्यर्थं भीक्षांदेही कृपा करी ।*

*अशीच तिची प्रार्थना केली जाते. मग ती 'किचन-पोएम्स्' म्हणून प्रकट झाली आणि तिचा अनुवादही केला; तरी अभिनिवेशरहित शब्दसौंदर्याबरोबरच तिचे भावसौंदर्य हे युगायुगांचे सत्य आहे. तेच ह्या अनुवादातूनही प्रकटले आहे.*

*–संपादक]*

---

नावापासूनच साधेपणातलं सौंदर्य जपणारा 'किचन पोएम्स' हा धीरुबेन पटेल यांच्या मूळ इंग्रजी कवितांचा मराठी अनुवाद मौज प्रकाशनानं नुकताच प्रकाशित केला आहे. मूळ इंग्रजी कवितांचा आत्मा जपणारा अनुवाद ज्येष्ठ कवयित्री उषा मेहता यांनी त्याच ताकदीनं अलवारपणे पेलला आहे.

'किचन' ही गोष्टच तशी भाषा, प्रांत, जात, धर्म ओलांडून सर्वव्यापी म्हणावी अशी आणि किचनशी संबंधित धाग्यादोऱ्यांचे रंगपोतही थोडाफार फरक वगळता सारखेच. त्यामुळे या 'किचन पोएम्स'ना जे एक सार्वत्रिक मूल्य लाभलंय त्यानं या कविता एका उंचीवर गेल्या आहेत. मध्यंतरी 'माजघरातल्या गप्पा' असं काहीसं आकाशवाणीवर वगैरे ऐकायला मिळायचं. कालांतरानं माजघर लुप्त झालं असलं तरी त्या चुलीपासच्या गप्पा, त्या गुजगोष्टी, सुखदु:खांची देवघेव, ती गुपितं आजही आधुनिकोत्तर जमान्यात आहेतच आणि त्या गप्पांची जागाही बदललेली नाहीये. 'चूल आणि



मूल' हे बाईचं पूर्वापारपासूनचं कार्यक्षेत्र समजलं जायचं. आज त्यात तिच्या इतर कर्तृत्वाची भर पडलेली असली तरी चूल आणि मूल मुळात आहेच आणि म्हणून तिथले भावबंधही अर्थातच आहेत. ते सगळ्या प्रकारचे भावबंध या कवितांमध्ये पाहायला मिळतात.

घरातल्या एखाद्या मोठ्या जबाबदार स्त्रीचा मायेचा स्पर्श लाभावा अन् तिच्या कुशीतच शिरावंसं वाटावं तसा या कवितांना स्वयंपाकघराच्या आश्वासक प्रेमाचा स्पर्श लाभलेला आहे. स्वयंपाकघराशी चिकटून येणाऱ्या स्त्रीसंबद्ध अशा अनेक संवेदनांना मोठ्या मायेनं कवेत घेणाऱ्या या कविता आहेत.

या कविता स्त्रीच्या बाल्यावस्थेपासून वृद्धावस्थे-पर्यंतच्या भावविश्वाचे मनोरम दर्शन घडवतात. परंपरेनं स्वयंपाकघराची जबाबदारी स्त्रीकडे सोपवली आणि आज आधुनिक काळातही ती जबाबदारी स्त्रीनं काहीशा आनंदानं स्वीकारली आहे. आजही स्वयंपाकघराची- कुटुंबातल्या सर्वांच्या तिन्ही त्रिकाळ खाण्याजेवण्याची,



अनुक्रमणिका

आहार आरोग्याची जबाबदारी स्वत:कडे ठेवायला स्त्रियांना आवडत आहे. अर्थात् त्याचा पिंजरा होतो आहे; आणि वर्षानुवर्षं त्या पिंजऱ्यात आपण अडकलो आहोत, अशी अडकलेपणाची भावनाही त्यात आहे. तरीही स्वयंपाकघराशी असलेले भावबंध ती कधी संपूर्ण समरसतेनं, कधी अनिच्छेनं, कधी प्रिय व्यक्तीला जिंकण्यासाठी ती जोडतेच जोडते. कारण या जबाबदारीबरोबर नवरा, मुलंबाळं, सासू-सासरे इ. कुटुंबीयांविषयी वाटणारी आस्था, प्रेम, काळजी तिला व्यक्त करता येते. मनापासून केलेल्या स्वयंपाकातून कुटुंबीयांविषयी वाटणाऱ्या प्रेमाचा आविष्कार करण्याची तिची अनोखी, हृदयंगम पद्धत आहे. कुटुंबातले सारेजण क्षुधाशांतीसाठी तिच्यावर अवलंबून असतात, तिनं बनवलेल्या पदार्थांविषयी ते समाधान व्यक्त करतात, यानं तिचा अंतरात्मा सुखावतो.

या स्वयंपाकघराची एक प्रकारे ती सम्राज्ञीच आहे. इथे तिला शांत वाटतं, विश्रांत वाटतं. स्वयंपाक करता करता ती स्वत:च्या आयुष्यातल्या चित्रविचित्र घटनांविषयी विचार करते. स्वयंपाकघराविषयी एक निरागस स्वामित्वभावना तिच्या मनात आहे. नवीन लग्न करून घरात आणलेल्या सुनेलाही ती त्याच भावनेतून प्रेमळपणे दटावते,-

*'ए बाई, सूनबाई*
*अशी पहात राहू नकोस माझ्याकडे*
*माझा मुलगा देऊन टाकलाय तुला*
*स्वयंपाकघर नाही दिलेलं...'*

बालपणापासूनच किचनचे धडे गिरवणाऱ्या, भातुकली खेळणाऱ्या मुलींपासून, तरुण वयात प्रेमात पडणाऱ्या आणि आवडलेल्या देखण्या राजकुमारानं 'स्वयंपाक येतो ना तुला करता?' अशा सहजच विचारल्यासारख्या प्रश्नानं हबकून जाणाऱ्या युवतीपासून, बाळाला खाऊ घालताना त्याच्या खोड्यांनी गोड त्रासून जाणाऱ्या आईपासून ते उतारवयात एकाकी अवस्थेत जगतानाही पक्षी, गोग्रास, अनाहूत पाहुणा आणि कुलदेवतेचा नैवेद्य अशा चार ताटल्या मांडणाऱ्या स्त्रीच्या हृद्य चित्रापर्यंत अनेक वयोगटातल्या स्त्रियांची हृदयंगम व्यक्तिचित्रं या कवितांमध्ये आहेत.

यातील बहुतेक स्त्रिया मध्यमवर्गीय गटात मोडणाऱ्या आहेत. मध्यमवर्गीय संस्कारांचं बळ त्यांच्या जगण्याला आहे. देव, धर्म, साऱ्यांचं संगोपन, स्त्रीत्वाच्या मर्यादां यात आयुष्याचं समाधान शोधणाऱ्या या स्त्रिया आहेत. वरवर पाहता त्यांना समाजाशी काहीच देणंघेणं नसावं असं वाटतं. परंतु तसं नाहीये. त्या विचार करणाऱ्या आहेत, प्रश्न विचारणाऱ्याही आहेत. आयुष्यात स्वत:च्या स्थानाबद्दल त्या जागरुक आहेतच पण घरात काम करणारी स्वयंपाकीणबाई किंवा बेरोजगार आणि व्यसनी नवऱ्याच्या संसाराला तिला रुचकर जिन्नस करून हातभार लावणाऱ्या स्त्रियांविषयी ममत्व आहे. तसंच समाजात चाललेल्या घडामोडींविषयी देखील या स्त्रिया त्यांच्या पद्धतीनं विचार करताना दिसतात. म्हणूनच ब्रँडनेमवाल्या पदार्थांविषयी त्या तिखट प्रतिक्रिया देतात; किंवा मोठ्या समारंभात स्वयंपाकाची जबाबदारी पुरुषच का घेतात नेहमी, असे प्रश्नही पडतात.

रूढार्थानं या स्त्रीवादी कविता नाहीत, तरीही स्त्रियांच्या भावविश्वात त्यांना आपसूक टोचणारे काटेही या कवितागत स्त्रिया मुलायमपणे काढून दाखवतात हे विशेष आहे. त्यामुळे केवळ स्त्रीवादीच नव्हे तर सर्वसामान्य स्त्रिया त्यांचं परंपरागत आयुष्य जगताना स्वत:च्या आयुष्याचा झाडाझुडा घेणारे प्रश्न विचार असतात. हा स्त्रीवादानं त्यांच्यापर्यंत पोहोचवलेला जाणिवांचा परिपाक आहे हे लक्षात घ्यायला पाहिजे. या बदललेल्या जाणिवांचं एक प्रातिनिधिक चित्रण या कवितांमध्ये निश्चितपणे येतं.

*'तरीही*
*असं सारं, वर्षानुवर्षं करीत राहणं*
*आहे का, खरंच तेवढ्या तोलाचं?'*
किंवा
*'मग काही फरक पडतो काहो*
*तुरुंग, कितीही प्रशस्त, उजेड असलेला*
*आणि छाऽन असला तरी!'*

असे प्रश्न ती उपस्थित करते. घरात काम करणाऱ्या स्वयंपाकीणबाईच्या जाळाकडे धगधगीतपणे एकटक बघत राहणाऱ्या नजरेत तिला जगण्याचा सारा विखार एकवटलेला दिसतो. स्वयंपाकघर म्हणजे एक अंधारी, तळठाव नसलेली आणि कधीच 'आता पुरे' न म्हणणारी विहीर आहे; याची जाणीवही तिला इथेच होते.

या कवितांतील भाषाशैली हा या कवितांना फार मोठ्या उंचीवर नेणारा घटक आहे. कवयित्रीनं रेखाटलेली विविध स्त्रियांची व्यक्तिचित्रं अत्यंत हृदयस्पर्शी आणि मनोरम झाली आहेत ती कवितागत भाषाशैलीमुळे. या भाषेला स्वत:चा असा एक अनलंकृत साधेपणा आहे; गोडवा आहे, स्त्रीसुलभ माधुर्य आहे, जगण्याविषयी, माणसांविषयी अपरंपार प्रेम आहे आणि विशेष म्हणजे अत्यंत आरसपानी असा मनाचा तळ दाखवणारं नितळपण, पारदर्शकत्व आहे. यात कुठेही विचारांची लपवालपव नाही, मनात येणारं दडवून काहीतरी वेगळीच प्रतिमा निर्माण करण्याचा सोस नाही. जगणं समृद्धपणे जगत असताना– मनाच्या अंतर्मनात निर्माण होणाऱ्या जगण्याविषयीच्या अत्यंत उत्स्फूर्त अशा त्या प्रतिक्रिया आहेत. कोणताही अभिनिवेश नसणं हेच या कवितांचं सामर्थ्य आहे. ते धीरुबेन पटेल यांच्या मूळ कवितांचं जितकं आहे तितकंच उषा मेहतांनी त्याच निरलसपणे केलेल्या अनुवादाचंही आहे. अनुवादाचा भासही होणार नाही अशा पद्धतीनं त्यांनी या कवितांतील आशय आपलासा करून त्यांचं हृदयांतर केलेलं आहे! या दोन्ही कवयित्रींना मन:पूर्वक सलाम!

◇◇◇

**अंजली कुलकर्णी**
३, विघ्नहर अपार्टमेंट,
जयवर्धमान सोसा.,
बिबवेवाडी रस्ता, पुणे ४११०३७
मो.: ९९२२०७२१५८

**ना. गो. चापेकर**

मनोरंजनापेक्षा ज्ञानसंवर्धनाकडे चापेकरांचे अधिक लक्ष दिसते. त्यांनी पत्रिकेला सामाजिक वळण लावण्यात यश संपादिलेले आहे, असे त्यांच्या संपादनाखाली प्रकाशित झालेल्या 'पत्रिके'वरून सहजपणे लक्षात येते. चापेकर यांच्या लेखनात भाषिकदृष्ट्या व सामाजिकदृष्ट्या महत्त्वाची माहिती व टिपणे असत. लघुकथा व कविता या वङ्मय-प्रकारांना त्यांनी अजिबात स्थान दिलेले नाही. सामाजिक विषय, मराठीचे भाषिक विशेष, निबंध, पुस्तक-परीक्षणे, ऐतिहासिक माहिती, परिषदवार्ता अशा क्रमाने विषय हाताळलेले आहेत. लोकसाहित्याला स्थान दिलेले आहे.



अनुक्रमणिका

म.सा. परिषदेचे माजी कोषाध्यक्ष–

# नाना जोशी : चित्रकार आणि प्रकाशक

– राजेन्द्र बनहट्टी

चित्रकार असलेला प्रकाशक किंवा प्रकाशक असलेला चित्रकार मराठी प्रकाशनविश्वात अभावानेच आढळतो. पण हा दुर्मिळ संयोग नाना गोपाल जोशी या रूपाने घडून आलेला आहे. ते एक नामवंत चित्रकार आणि त्याचबरोबर यशस्वी प्रकाशक म्हणून मराठी वाचकांना परिचित आहेत. कला आणि व्यवसाय यांची ही अवघड युती त्यांच्या जीवनात कशी निर्माण झाली. याचा शोध त्यांच्या पंच्याहत्तरीच्या निमित्ताने घेणे उद्‌बोधक ठरणार आहे.

नाना जोशी हे मूळचे सोलापूर जिल्ह्यातील, आळंद तालुक्यामधल्या कौलगी गावचे. त्यांचे वडील हे सोलापूरात जोशीपण म्हणजे भिक्षुकी करीत असत. घरची परिस्थिती बेताची होती. नाना धरून घरात सहा भावंडे होती. अकरावीपर्यंत नानांचे शिक्षण सोलापुरात झाले. त्यांचे वडील चित्रकार होते. पौराणिक पात्रांची चित्रे ते काचेवर काढत असत. नाटकाचे पडदे रंगवत असत. नानांच्या आईलाही देवादिकांच्या मूर्ती बनविण्याचा छंद होता. आईवडिलांच्या कलेचा वारसा नानांना लाभला. त्यांच्यात कलेची आवड निर्माण झाली. ते अगदी पहिलीत असल्यापासून चित्रे काढू लागले. शालेय जीवनात त्यांच्या चित्रांचे कौतुक झाले. अकरावीनंतर शालेय शिक्षणाला त्यांनी रामराम ठोकला आणि सरळ १९६० साली पुण्याचा रस्ता धरला. पुण्यात त्यांना कोणाचाही आधार नव्हता. फक्त हातात होता चित्रकलेचा छंद आणि मनात होती विलक्षण जिद्द. त्या जोरावर पुण्यातील मासिके, दैनिके आणि प्रकाशनसंस्था यांच्या कार्यालयात अविरत खेटे घालून त्यांनी चित्रांची कामे मिळवली. अविश्रांत मेहनतीच्या बळावर त्यांनी हळूहळू चित्रकार म्हणून आपला जम बसवला. अर्थार्जन तर केलेच, पण त्याचबरोबर चित्रकलेचे शिक्षण घेऊन जी. डी. आर्टचा डिप्लोमा हस्तगत केला. सुरुवातीला नानांनी वसंत काणे यांच्या 'रोहिणी', 'ऊसमळा',



'पंचायत' ह्या मासिकात आणि संध्या या सायंदैनिकात काम केले. पण तेवढ्यावरच त्यांचा कुंचला थांबला नाही. शांत, संयमी, आर्जवी वृत्ती आणि अपरिमित कष्ट करण्याची तयारी यामुळे त्यांना पुढे चित्रांचे भरपूर काम मिळत गेले. केसरी, सह्याद्री, मेनका, माहेर, पैंजण, विशाखा, तरुण भारत अशा प्रतिष्ठित दिवाळी अंकांची मुखपृष्ठे त्यांनी अनेक वर्षे केली. हुकुमी आणि तत्परतेने उत्तम चित्रे काढणारा चित्रकार म्हणून त्यांचे बस्तान बसले. तशी प्रकाशकाकडून पुस्तकांची मुखपृष्ठे करण्यासाठी मागणी येऊ लागली. पुस्तकाचा मजकूर सूक्ष्मपणे वाचून आशयाप्रमाणे चित्र तयार करण्याची नानांची पद्धत होती. परिणामी चित्रे उठावदार आणि समर्पक होत असत. त्यामुळे पुस्तकाच्या प्रकाशकांनाच नव्हे तर लेखकांनासुद्धा त्यांची मुखपृष्ठे पसंत पडत असत. मराठीतील बहुतेक ख्यातनाम लेखकांच्या पुस्तकांची मुखपृष्ठे उत्कृष्ट रीतीने केल्यामुळे चित्रकार म्हणून प्रकाशनक्षेत्रात नानांचा लौकिक निर्माण झाला. ना. सी. फडके, पु. भा. भावे यांच्यासारख्या दिग्गज लेखकांनी त्यांच्या मुखपृष्ठाचे समक्ष भेटून भरघोस कौतुक केले; आणि शाबासकी दिली. ही नानांच्या चित्रकलेतील नैपुण्याची निखळ



अनुक्रमणिका

पावती होती. १९६४ पासून तर १९८० पर्यंत पंधरा सोळा वर्षांत नानांनी दिवाळी अंकांची सुमारे ८०० मुखपृष्ठे केली. दरवर्षी ते किमान ४० ते ५० दिवाळी अंकांची मुखपृष्ठे तयार करीत असत. याच काळात त्यांनी केलेल्या पुस्तकांच्या मुखपृष्ठांची संख्या हजारांहून अधिक भरेल. मराठी प्रकाशन विश्वात एक लोकप्रिय आणि कुशल चित्रकार अशी नानांची प्रतिमा आता प्रस्थापित झाली होती. आर्थिक स्थैर्यही प्राप्त झाले होते. कामाचा भरपूर ओघ चालून येत होता. चित्रकार म्हणून त्यांची कीर्ती महाराष्ट्राच्या बाहेरही पसरली होती. दिल्लीच्या स्टार पब्लिकेशन, मनोज प्रकाशन या प्रकाशकांच्या तसेच गुलशन नंदासारख्या लोकप्रिय लेखकाच्या पुस्तकांची मुखपृष्ठेही त्यांनी तयार केली होती. मराठी खेरीज अन्य भाषांमधील पुस्तकांची कव्हर डिझाईनस करणारे ते कदाचित पहिले मराठी चित्रकार होते. चित्रकार म्हणून यशाची एक एक पायरी नाना अशी पादाक्रांत करीत होते.

चित्रांच्या रंगभऱ्या दुनियेत ते मनोभावे रममाण झाले होते. यशाचे शिखर गाठल्यावर चित्रकार म्हणून त्यांच्या जीवनाचे सार्थक झाले असते. पण तसे घडले नाही. कारण नियतीने त्यांच्यासाठी वेगळीच योजना करून ठेवली होती.

डोळ्यांच्या उपचारासाठी पुणे, मुंबईच नव्हे तर हैद्राबाद, दिल्ली येथील अनेक निष्णांत नेत्रतज्ज्ञांकडे त्यांनी धाव घेतली. उपचारांची शिकस्त केली, पण उपयोग झाला नाही. सहा महिन्यांत नाना दोन्ही डोळ्यांची दृष्टी गमावून बसले. त्यांच्या जीवनात अंधारयुग सुरू झाले. रंगांचा खेळ खलास झाला.

चित्रकारिता करताना अनेक प्रकाशकांशी त्यांचे जवळचे संबंध निर्माण झाले होते. प्रकाशकांचे कामकाज, त्यांचा व्यवहार त्यांनी जवळून चौकस नजरेने न्याहाळला होता. लेखकाकडून पुस्तक लिहून घेतल्यावर त्यावर मुद्रणसंस्कार करून त्याची बाजारात विक्री करण्यापर्यंतच्या प्रकाशनाच्या प्रक्रियेचे त्यांनी डोळस आणि साद्यंत निरीक्षण केलेले होते. त्या निरीक्षणाच्या आधारावर त्यांनी प्रकाशनाचा व्यवसाय करायचा निर्णय घेतला. अनेक अडचणींवर मात करून तो निर्धाराने अमलात आणला; आणि स्वत:च्या 'सन पब्लिकेशन्स' या प्रकाशन संस्थेची स्थापना केली. ते पुस्तक प्रकाशक झाले. त्यांच्यातल्या चित्रकाराचे रूपांतर प्रकाशकात झाले. डोळ्यांपुढे अंधार असतानाही ते लेखकांचे साहित्य प्रकाशात आणू लागले.

प्रकाशक म्हणून नावलौकिक आणि स्थैर्य मिळविल्यानंतर नाना जोशी यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद आणि मराठी प्रकाशक परिषद या संस्थांच्या कार्यात भाग घेतला. या दोन्ही संस्थांचे कोषाध्यक्ष म्हणून त्यांनी काही काळ काम केले आणि त्या संस्थांच्या आर्थिक परिस्थितीत सुधारणा केल्यामुळे ते प्रशंसेच पात्र ठरले.

आज नाना जोशी पंचाहत्तरीच्या उंबरठ्यावर उभे आहेत. सार्वजनिक संस्थांच्या कार्यातून ते मुक्त झाले आहेत. प्रकाशक म्हणून ते निवृत्त झाले आहेत. चित्रकलेचा व्यवसायही त्यांनी बंद केला आहे. पण चित्रकार म्हणून ते निवृत्त झालेले नाहीत. त्यांच्यातला चित्रकार अद्याप जिवंत आहे. असे म्हणतात की, कलावंत वृद्ध होत जातो तशी त्याची कला ही तरुण आणि परिणत होत जाते. तसेच नानांचे झाले आहे. त्यांची चित्रकला अजूनही ताजी टवटवीत आहे.

आजही व्यवसाय म्हणून नव्हे, तर 'स्वान्तः सुखाय' ते चित्र काढत असतात. घरी कधी आले तर माझ्या नातवंडांना, पक्षी, प्राणी यांची चित्रे काढून, ते खूश करतात. मित्रांच्या वाढदिवसांच्या प्रसंगी स्वत: काढलेली त्यांची पोर्ट्रेटस् भेट देऊन ते मित्रांना चकित करतात. त्यांच्या चित्रकलेची किमया अशीच दीर्घकाळ रसिकांना चकित करीत राहो. हीच त्यांच्या पंचाहत्तरीनिमित्त शुभेच्छा.

◇◇◇

**राजेन्द्र बनहट्टी**



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कर्ते कार्यकर्ते—

# एक 'निपुण' व्यक्तिमत्त्व!

– डॉ. आनंद यादव

संपादक, मुद्रणशास्त्राचे विशेष अभ्यासक, प्रकाशक, साहित्य परिषदेचे कार्यकर्ते म्हणून सुपरिचित आहेत ते ह. ल. निपुणगे.

माझी आणि त्यांची ओळख सुमारे ३० वर्षांपासूनची आहे. त्या वेळी मी २५० शिवाजीनगर, काँग्रेस भवनच्या जवळ राहत होतो. तिथून निघून मी चालत चालत गावात येत असे. वाटेवरच कन्याशाळेजवळ निपुणगे यांचे पुष्पक प्रकाशनाचे कार्यालय होते. त्या वेळी त्यांच्या ऑफिसच्या इमारतीचे बांधकाम चालू होते. त्यांचे ऑफीस आतील बाजूस पहिल्या मजल्यावर होते.

मेहता पब्लिशिंग हाऊसने त्या वेळी नुकतेच पुण्यात काही पुस्तकांचे छपाईचे काम चालू केले होते. ते श्री. निपुणगे पाहात असत. माझ्या 'माळावरची मैना' आणि 'स्पर्शकमळे' या पुस्तकांची छपाई-मांडणी श्री. निपुणगे यांनी अतिशय देखणी केली. त्यावेळेपासून ते माझे अगदी जवळचे मित्र झाले.

त्याचवेळी म्हणजे १९८१ च्या सुमारास त्यांनी 'विशाखा' दिवाळी अंकांचे प्रकाशन-संपादन हाती घेतले. हा दिवाळी अंक राजाभाऊ फडणीस काढीत असत. त्यांनी संपादित केलेला पहिलाच अंक अतिशय दर्जेदार निघाला. पण तो त्यांच्या अपेक्षेप्रमाणे खपला मात्र नाही. तरी पण अधिक नेटाने ते दर्जेदार अंक प्रकाशित करीत राहिले. पुढे त्यांनी १९८६ च्या सुमारास 'विशाखा' मासिक सुरू केले. या मासिकाचे वैशिष्ट्य म्हणजे प्रत्येक अंकांवर एका साहित्यिकाचे उत्कृष्ट छायाचित्र आणि आत त्या लेखकाच्या साहित्याचा परिचय.



या मासिक अंकामध्ये त्यांनी रणजित देसाईंवर एक अंक काढला होता. त्यातील लेखाची जबाबदारी त्यांनी माझ्यावर सोपविली होती. त्या वेळी आम्ही दोघेही कोवाडला रणजित देसाई यांच्या घरी गेलो होतो. प्रवासात साहित्यविषयक खूप गप्पागोष्टी झाल्या.

या दरमहाच्या अंकातील पहिल्या अंकावर त्यांनी एस. एम. जोशी यांचे छायाचित्र छापले होते. आत त्यांच्या 'मी, एस. एम.' या आत्मवृत्ताचा परिचय करून देणारा भाई वैद्य यांचा लेख छापला होता. लेखकाची कोणत्याही विषयासाठी अचूक निवड करणे हे निपुणगे यांचे वैशिष्ट्य. या दरमहाच्या अंकामध्ये त्यांनी मंगेश पाडगावकर, विंदा करंदीकर आदि निवडक लेखकांची छायाचित्रे आणि त्यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये सांगणारे विशेष लेख, तसेच प्रत्येक लेखकाचा अल्पपरिचय यामुळे दरमहाचे हे अंक विशेष संदर्भमूल्य घेऊन निर्माण झाले. असे अंक त्यांनी सातत्याने तीन वर्षे काढले. मासिकाच्या शेवटच्या अंकावर पु. ल. देशपांडे यांचे छायाचित्र आणि त्यांच्यासंबंधीचे लेख प्रकाशित केले होते. ते उत्तमच होते.

या दरमहाच्या अंकात माझा नंबर लागला नाही. याचे मला वाईट वाटले. असो.

पुढे फक्त दिवाळी अंक मात्र नियमितपणे प्रकाशित होत होते. त्यांना पुरस्कारही मिळत होते. १९८६, ८७ असे लागोपाठ दोन वर्षे विशाखा दिवाळी अंकाला महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पुरस्कार मिळाले. त्यानंतरही काही वर्षांनी 'मसाप'चा आणखी एक पुरस्कार मिळाला.

मुंबई मराठी पत्रकार संघ, वृत्तपत्र लेखक संघ वगैरे अनेक पुरस्कार विशाखा दिवाळी अंकाला मिळाले. एवढेच नव्हे तर कुटुंब कल्याण कार्यालयाचे उत्कृष्ट जाहिरातीचे दोन पुरस्कारही 'विशाखा'ला मिळाले.

प्रकाशक म्हणूनही त्यांनी बऱ्यापैकी नाव लौकिक मिळवला. ह. मो. मराठे यांच्या त्यांनी प्रकाशित केलेल्या 'पक्षिणी'

या पहिल्याच कथासंग्रहाला म. राज्य सरकारचे पारितोषिक मिळाले. पुढे त्यांनी ह. मोंची मधलंपान, पहिला चहा आदि पुस्तके प्रकाशित केली. उद्धव ज. शेळके यांची 'अनौरस', आचार्य अत्रे यांच्या जीवन चरित्रावरील 'साहेब' तसेच कुष्टरोग्याच्या जीवनावरील 'अगतिका' ह्या कादंबऱ्या प्रकाशित केल्या. त्यांनी प्रकाशित केलेल्या कादंबऱ्या विशेष गाजल्या. रवींद्र भट यांची 'देवाची पाउले' ही कादंबरीही उत्कृष्ट ठरली. गो. गं. पारखी यांच्या त्यांनी प्रकाशित केलेल्या 'बन्सीभैय्या' या कादंबरीवर चित्रपट निघाला. तसेच इतर अनेक लेखकांचे कथासंग्रहही त्यांनी प्रकाशित केले. सुशीला संकपाळ या नव्या लेखिकेची 'कसरत' ही कादंबरी प्रकाशित केली. ललितवाङ्मयाबरोबरच वेगवेगळे विषय शोधून त्यांनी पुस्तके प्रकाशित केली. 'रेखन आणि लेखन' हे त्यांनी प्रकाशित केलेल्या चित्रकलेवरील त्यांचे पहिले प्रकाशन. त्यानंतर त्यांनी 'अभिनव शेतकी शास्त्र' हे शेतीविषयावरील पुस्तक प्रकाशित केले. अगदी अलीकडे त्यांनी क्रिकेटचा ज्ञानकोश हा रवींद्र पाटकर यांचा कोशही प्रकाशित केला.

त्यांनी प्रकाशित केलेल्या ज्ञानेश्वर आणि कबीर या डॉ. कृ. ज्ञा. भिंगारकर यांच्या पुस्तकाला एकूण ७ विविध पुरस्कार मिळाले.

प्राचार्य बाळ गाडगीळ यांचे 'वळचणीचे पाणी' हे आत्मचरित्रही त्यांनी प्रकाशित केले.

त्यांनी बालकुमार वाङ्मयाची बरीच पुस्तके प्रकाशित केली. त्यांची एकूण प्रकाशनांची संख्या २५० च्या आसपास तरी असावी.

पुस्तक प्रकाशनाच्या जोडीला त्यांनी 'कृषीवल' ही शेतकऱ्यांसाठी उपयुक्त डायरी सातत्याने २५ वर्षे प्रकाशित केली. तसेच महिलांसाठी 'गृहिणी' डायरी ते गेली चाळीस वर्षे नियमित प्रकाशित करीत आहेत. 'विशाखा' दिवाळी अंकाच्या मुखपृष्ठावर त्यांनी गेली पाच-सहा वर्षे पुरुषांची छायाचित्रे छापून वेगळाच उपक्रम राबविला आहे. यंदाचा (२०१२) चा कवी ग्रेस विशेषांक तर अत्यंत उत्कृष्ट झाला आहे. त्यावर ग्रेस यांचे छायाचित्र आहे.

दिवाळी अंक, डायऱ्या, अनेक पुस्तकांचे प्रकाशन करीत असतानाच त्यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेसाठी भरीव काम केले आहे. १९९२ पासून गेली सतत १८ वर्षे खूपच काम केले आहे.

प्रथम ते कार्यकारिणीवर निवडून आले. त्यानंतर ४ वर्षे ते म. सा. पत्रिकेचे संपादक होते. त्या वेळी ते कसे काय पत्रिकेचे संपादन करणार याविषयी मी साशंक होतो. पण पत्रिका सर्वसामान्यांना आवडावी असा दृष्टिकोन ठेवून त्यांनी एकापेक्षा एक सरस अंक संपादित केले.

त्यानंतर ते प्रमुख कार्यवाह म्हणून निवडून आले. त्या वेळी डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्याशी झालेल्या मतभेदांमुळे त्यांना राजीनामा द्यावा लागला. नंतर पुन्हा चार वर्षांनी ते कोषाध्यक्ष म्हणून निवडून आले आणि त्यांनी कोषाध्यक्ष म्हणून पाच वर्षे भरीव काम केले. 'मसापत्रिका' आर्थिकदृष्ट्या भरभक्कम होण्यासाठी त्यांनी पत्रिकेला जाहिराती मिळविल्या. तसेच मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ रा भाग १ व २ यांच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशनासाठी भरघोस अर्थसाहाय्य मिळवून ते खंड प्रकाशित केले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेत त्यांनी केलेल्या एकूणच कामाला खूप महत्त्व आहे. पुणे नगर वाचन मंदिर आणि याज्ञवल्क्य आश्रम या दोन्ही संस्थांच्या कार्यकारिणीवर त्यांनी काही काळ काम केले. तेही उत्तमच केले.

प्रकाशक, संपादक, म. सा. परिषदेतील एक कार्यकर्ता या विविध भूमिकांतून श्री. निपुणगे यांनी केलेल्या कामाबद्दल त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन केलेच पाहिजे असे मला मनोमन वाटले म्हणूनच हा छोटासा लेख मी लिहिला आहे.

येत्या २ मे २०१३ ला ह. ल. निपुणगे वयाची ७५ वर्षे पूर्ण करीत आहेत. त्यांचे आत्मचरित्राचे लेखन सध्या चालू आहे. ते लवकरच प्रकाशित होणार आहे.

त्यांना आरोग्यपूर्ण दीर्घायुष्यासाठी मन:पूर्वक शुभेच्छा!

◇◇◇

**डॉ. आनंद यादव**
'भूना' कलानगर, सातारा रस्ता,
धनकवडी, पुणे ४११०४३
फोन : २४३७९४५३

# निवडक नवे

परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी निवडक ग्रंथांचा परिचय — संपादक

**एक रोमहर्षक प्रवास**

अच्युत गोडबोले यांचे 'मुसाफिर' पुस्तक वाचताना एक वेगळाच रोमहर्षक अनुभव आला.

या पुस्तकाचा अनुभव फारच वेगळा आहे. सोलापूर मधील आपल्या सामान्य कुटुंबात भिमसेन जोशींसारखे अनेक असामान्य लोक येऊन गेलेत. त्याचे वर्णन सुद्धा साधेपणाने पण वाचकाला आनंद देईल असेच आहे.

'बोर्डा'मध्ये 'मेरिट'मध्ये आल्यानंतर सुद्धा पाय जमिनीवरच होते. त्यानंतर 'आय् आय् टी' मधील मनोरंजक अनुभव वाचताना वाचक स्वत:चे कॉलेजचे दिवस आठवतो. त्याच्यासमोर कॉलेजमधल्या रम्य आठवणींचा चित्रपट डोळ्यासमोर उभा राहतो. पुढे आदिवासी लोकाबरोबर आलेले अनुभव, एकीकडे 'आय् आय् टी' सारखे करीअर, तर दुसरीकडे माणूस म्हणून आपले कर्तव्य करणारा विद्यार्थी व त्याला आलेले अनुभव. हे आजकालच्या विद्यार्थीवर्गास खूप काही शिकवून जातात. तुरुंगातील आलेले अनुभव वाचताना एखादी रहस्यकथा वाचत आहोत, असे वाटते. लेखकाने कैद्यांच्या मानसिकतेचे अत्यंत उत्तम वर्णन केले आहे.

'इन्फोटेक' या भागात लेखकाने स्वत:विषयी वेगळीच माहिती दिली आहे. ते धाडस फार कमी लोकात असते. त्यामध्ये लेखकाला पानपराग, जर्दा, सिगरेट, दारू नंतर हातभट्टीची दारू एवढी व्यसने लागल्याचे लेखकाने प्रांजळपणे सांगितले आहे, पण एके दिवशी ही व्यसने संपूर्ण सोडून नवीन आयुष्याला सुरुवात केली. हा अनुभव सध्याच्या व्यसनाधीन मुलांना व अनेकांना सांगण्यासारखा आहे. त्यामुळे त्यांचे आयुष्य बदलण्यास उपयोग होईल.

सॉफ्टवेअरमध्ये वरच्या हुद्द्यावर असताना लेखकाच्या हुशारीचे कौतुक अनेक वर्तमानपत्रात तसेच अनेक उद्योगपतींनी केले. पण त्याचबरोबर झालेल्या चुका व त्यामुळे कंपनीला झालेला तोटा हे वास्तव लेखकाने वाचकासमोर अत्यंत उत्तमरीतीने मांडले आहे. त्याचा उपयोग अनेक उद्योजकांना किंवा नवीन 'बिझिनेस' करणाऱ्यांना निश्चित होईल.

ह्या सर्व गोष्टी घडत असताना लेखकाला स्वत:च्या मुलाच्या कठीण आजारातून जावे लागले. एकीकडे मॅनेजमेंटमधील उच्च जागा तर दुसरीकडे मुलाचे कठीण आजारपण! पण ही तारेवरची कसरत अत्यंत धैर्याने, खंबीरपणाने आपल्या सहचरणींच्या मदतीने पार पाडली. असे अनुभव जेव्हा सामान्य वाचक वाचतात तेव्हा त्यांनाही यामधून बरेच काही शिकावयास मिळते.

चाकोरीतील चौकोनी आयुष्य लेखकाला कधीच आवडले नाही. सर्व कामे काही काळ स्वत:ने करायची या वृत्तीने लेखक खऱ्या अर्थाने 'परफेक्शनिष्ट' झाला. कायम वेगवेगळ्या व्यक्तीबरोबर संवाद साधून त्याचा उपयोग लेखकाने आपल्या नोकरीच्या काळात केला. व त्याचा फायदाही लेखकाला झाला. त्यांचे 'मॅनेजमेंट बाय वॉक' हे वाक्य मला फार आवडले.

बोर्डरूम, (व्यवस्थापन) नादवेध (संगीत), किमयागार (विज्ञान), अर्थात (अर्थशास्त्र), गुलाम (गुलामगिरी) अशा विविध प्रकारच्या विषयावर अप्रतिम लेखन लिहिणाऱ्या लेखकाच्या बद्दल माझ्यासारख्या सामान्य माणसाने आणखी काय लिहायचे?

**मुसाफिर - अच्युत गोडबोले**

**रमेश जोशी**

### कल्पनेपलीकडच्या वैद्यक सत्यकथा

'गोष्टी लग्नाच्या' हा कथासंग्रह, विख्यात स्त्रीरोगतज्ज्ञ आणि 'शतायुषी' या लोकप्रिय दिवाळी अंकाचे संपादक, डॉ. अरविंद संगमनेरकर यांचा, दिलीपराज प्रकाशनने प्रकाशित केला आहे. 'लग्न' हा विषय जितका नाजुक तितकाच तो शारीरिक, सामाजिक, धार्मिक आणि मानसिक धाग्यांनी विणला गेला आहे. डॉक्टरांसमोर या विषयातील समस्या संकोच न बाळगता सांगितल्या जातात; आणि माणसांच्या जटिल नात्यांचे, सत्यालाही लाजवील इतके विलक्षण गंभीर स्वरूप उघडे होते. यांना 'वैद्यक-कथा' म्हणावे असे डॉक्टरांचे म्हणणे आहे. सख्ख्या माणसांना कळणार नाही अशा लोकविलक्षण कथा डॉक्टरांसमोर सहजगत्या उभ्या राहतात. डॉक्टर आणि पेशंट यांचे वेगळेच भावविश्व जोडले जाते. त्यातून डॉक्टर संगमनेरकरांसारखा सहानुभूती जपणारा डॉक्टर अनेक व्याधींनी आणि समस्यांनी ग्रस्त झालेल्या पेशन्टस्ना देवासारखा वाटतो.




या कथा लिहिताना डॉक्टरांनी एक वेगळा वैद्यक शब्दकोष – निवेदनाच्या ओघात उघड केला आहे. त्याचे एक वेगळे पुस्तक व्हावे, म्हणून त्यांचे संशोधन चालू आहे. या पुस्तकाची वेगळी सविस्तर समीक्षा झाली पाहिजे. तशी ती होईलच. तूर्त ही तोंडओळख– निवडक नव्यासाठी!

**'लग्नाच्या गोष्टी'**
*लेखक :* डॉ. अरविंद संगमनेरकर
*प्रकाशक :* दिलीपराज प्रकाशन प्रा.लि. पुणे
१ डिसेंबर २०१२,
*पृष्ठे :* २५४, *मूल्य :* रु. ३००/-

### एका पथावरील दोन पंथ

ईशप्रेम हा भक्तीचा गाभा आहे. ईश्वरी तत्त्वात विलीन होणे – एखाद्या तरी तत्त्वात विलीन होणे हेच सूफी संताचे ध्येय, आणि भक्तीचे गमक आहे. साधकावर प्रेम करणारा आणि त्याला दु:ख देणारा ईश्वरच आहे. भक्तीला अनुभूतीचीही जोड लागते. ज्ञान हाच ईश्वर आणि अनुभव हेच त्याचे अमृततत्त्व! १२४४ ते १३२५ या निजामुद्दीन औलियाच्या काळात सूफी पंथाने चळवळीचे रूप धारण केले. सूफीमार्ग हा सातत्याने ऐतिहासिक आणि संस्थात्मक मार्ग आहे. महाराष्ट्राच्या भक्ती चळवळीशी केलेली तुलना – साम्यभेद – अभ्यसनीय आहे. या ग्रंथावरही सविस्तर परीक्षण येईल. तूर्त ही तोंड ओळख .

**एका पथावरील दोन पंथ : भक्ती आणि सूफी**
*लेखक :* डॉ. अलीम वकील
*प्रकाशक :* प्रतिमा प्रकाशन – पुणे

### ग्रेस – सारंगसुधा

कवि ग्रेस यांच्या गूढ कवितेने महाराष्ट्राला वेड लावले. त्यांच्या प्रभावाने अनेकांनी आपल्या कविता लिहून – कविता लेखनाच्या मार्गाने ग्रेस यांना स्पर्श






अनुक्रमणिका

करयाचा प्रयत्न केला. परंतु ते आकाशाच्या जवळपणा इतकेच अप्राप्य आहे, हे कळाल्यावर कायमची अस्वस्थता अनुभवीत आहेत. ग्रेस यांच्या प्रतिमांचे गारूड आणि भूलभुलैया म्हणजे मृगजळाचे बांधकाम आहे. कवी सारंगसुधा यांनी या अनवट वाटेने जाण्याचा केलेला प्रयत्न वाचनीय तर आहेच; पण मनाला चटका लावणाराही आहे.

**ग्रेस – 'सारंगसुधा'** (सुधाकर शंकर गुंजाळ) (कवितासंग्रह)

*प्रकाशक :* प्राजक्त प्रकाशन, औरंगाबाद

जानेवारी २०१३,

*पृष्ठे :* १६०, *किंमत :* रु. १३०/-

**संतांची कथाकविता – (कै.) डॉ. रत्नाकर मंचरकर**




प्रसिद्ध साक्षेपी समीक्षक डॉ. मंचरकर हे प्रामुख्याने संतवाङ्मयाचे सहृदयतेने परिशीलन करणारे लेखक होते. त्यांनी संतांच्या ज्ञानकथा, लीलाकथा, रसवान महाकाव्ये आणि कथाकवितांचा सविस्तर धांडोळा या पुस्तकात घेतला आहे. पंडितकवी मुक्तेश्वर, मोरोपंत, श्रीधर यांच्याबरोबरच त्यांनी नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदासांच्या कथाकवितेचा रूपबंध स्पष्ट केला आहे. सारांश, मध्ययुगीन कथाकवितेचा आढावा घेतला आहे. तात्त्विक आणि रूपकात्मक अंगांनी कथाकवितेचे केलेले परीक्षण रंजक तितकेच तात्त्विक आहे. विद्वत्व आणि कवित्वाचा सुरेख मेळ त्यांच्या निरूपणात्मक समीक्षेला लाभला आहे. डॉ. द. के. गंधारे यांनी त्याचे संपादन केले आहे.

**संतांची कथाकविता**

डॉ. रत्नाकर बाबूराव मंचरकर (संपादन : डॉ. द. के. गंधारे)

*प्रकाशक :* स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद ४३१००३

मार्च २०१२

*पृष्ठे :* १९७

*किंमत :* रू. २००/-

**कर्ण – महापुरुष की खलपुरुष**

सौ. माधुरी सप्रे यांनी पीएच्‌डीसाठी निवडलेला हा विषय या-ना-त्या कारणाने अधुरा आणि अप्रकाशित राहिला. अनेक विद्वानांच्या मार्गदर्शनाने हा प्रबंध आकारास आला आहे. महाभारतातील कर्णाच्या जीवनावरील ठळक घटनांच्या आधारे शोधनिबंधाची वाटचाल चिकित्सक झाली आहे. मानवी मनाची आणि संस्कृतीची सर्व पाळेमुळे महाभारतात आलेली आहेत. 'भाष्यकाराते वाट पुसतु' कर्णाचे हे आगळेवेगळे व्यक्तिमत्त्व अनेक कादंबरीकारांनी हाताळले; परंतु प्रबंधाच्या चिकित्सक वाटेने हे पहिलेच संग्रह्य पुस्तक!




**कर्ण : महापुरुष की खलपुरुष**

*लेखिका :* सौ. माधुरी सप्रे

*प्रकाशक :* प्रसाद प्रकाशन - पुणे – जून २०१२,

*मूल्य :* रु. ३००/-, *पृष्ठे :* ३१५

◇◇◇

**संपादक : म. सा. पत्रिका, पुणे ३०**

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त
(१६ डिसेंबर २०१२ ते १५ मार्च २०१३)

### — पुणे शहर —

**१) दि. २१ जानेवारी २०१३ : माता-पितामहस्मृतिकार्यक्रम :** महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि डॉ. मेधा शिधये परिवार यांच्या संयुक्त विद्यमाने कै. प. चि. नेने व कै. कृ. ना. दातार यांच्या स्मृतिप्रित्यर्थ डॉ. शं. ना. नवलगुंदकर यांचे 'समाज-परिवर्तन दशा आणि दिशा' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. मेधा सिधये यांनी मनोगत व्यक्त केले. श्री. वासुदेव सिधये यांचे स्वागत करण्यात आले.

**२) दि. २५ जानेवारी २०१३ : श्रद्धांजलीसभा :** ज्योत्स्ना देवधर, डॉ. वि. म. बाचल, डॉ. शरच्चंद्र गोखले यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य व अध्यक्षस्थानी साहित्य प्रेमी भगिनी मंडळाच्या मंदाताई खांडगे या दोघी व्यासपीठावर होत्या. तसेच परिषदेचे कोषाध्यक्ष सुनील महाजन व प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी व्यासपीठावर उपस्थित होते. सु. वा. जोशी, डॉ. प्र. ल. गावडे, श्री. आपटे, डॉ. कल्याण दिवेकर, स्वप्नील पोरे, शंकरराव पाटणकर, रत्नाकर कुलकर्णी, शरद गोगटे, प्रा. मिलिंद जोशी, चंदा नाईक (ज्योत्स्ना देवधर यांच्या कन्या), स. अ. जोशी, डॉ. माधवी वैद्य या वक्त्यांनी आपले श्रद्धांजलीपर विचार प्रकट केले. डॉ. मंदा खांडगे यांनी अध्यक्षीय समारोप केला. शेवटी मिनिटभर उभे राहून उपस्थितांनी मूक श्रद्धांजली वाहिली.

**३) दि. ३० जानेवारी २०१३ : आहिताग्नि शं. रा. राजवाडेस्मृति व्याख्यान :** प्रा. राजा दीक्षित यांचे 'केशवसुतांची स्वर्ग समक्षता आणि महाराष्ट्रातील प्रबोधन' या विषयावर व्याख्यान झाले. या कार्यक्रमाच्या प्रारंभी नुकतेच दिवंगत झालेले अकलूज येथील कवी सतीश इनामदार यांना श्रद्धांजली अर्पम करण्यात आली. या प्रसंगी आजचे वक्ते प्रा. राजा दीक्षित व दीपक करंदीकर यांनी कवी सतीश इनामदार यांच्याविषयी श्रद्धांजलीपर भावना व्यक्त केल्या.

**४) दि. ३१ जानेवारी २०१३ : किर्लोस्कर वसुंधरा आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव :** महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्यावतीने दुसरे पर्यावरण साहित्यसंमेलन 'जलसंवेदना' या विषयावर डॉ. माधवराव चितळे यांच्या अध्यक्षतेखाली संपूर्ण दिवसभर आयोजित करण्यात आले होते. सकाळी रेणुका स्वरूप शाळेतील मुलींनी वसुंधरा व धरणी मातेच्या आरत्या सादर केल्या. संयोजक वीरेन्द्र चित्राव यांनी स्वागत प्रास्ताविक केले. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या हस्ते रोपाला पाणी घालून संमेलनाचे उद्‌घाटन झाले. श्री. द. महाजन यांचा हृद्य सत्कार करण्यात आला. व्यासपीठावर अनुपममिश्र उपस्थित होते. डॉ. माधवराव चितळे यांचे बीजभाषण झाले. दुसऱ्या सत्रात 'जलसंवेदना' या विषयावर डॉ. अरुणा ढेरे यांचे व्याख्यान झाले. तिसऱ्या सत्रात सुरेखा शहा व रेखा बैजल यांची मुलाखत डॉ. माधवी वैद्य यांनी घेतली. दीपक करंदीकर यांनी सर्वांचा परिचय करून दिला. नंतर जलसाक्षरता या विषयावर डॉ. माधव गाडगीळ यांचे व्याख्यान झाले. 'जलबिंब' हा डॉ. संगीता वर्वे व चंद्रकांत काळे यांनी कविता, वेचे यांवर आधारित

कार्यक्रम सादर केला. अनुपम मिश्र व डॉ. माधवराव चितळे यांचे समारोपाचे भाषण झाले. यावेळी सुप्रिया मराठे यांचा विशेष सत्कार करण्यात आला. शेवटी प्रा. अनुजा गडगे यांनी उत्स्फूर्तपणे 'स्वरचित पाण्याची प्रतिज्ञा' वाचून दाखविली.

**५) दि. ४ फेब्रुवारी २०१३ : का. र. मित्र व्याख्यानमाला - पुष्प पहिले :** इंदिरा संत, वा. रा. कांत, बी. रघुनाथ यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त इंदिरा संत यांच्या कवितेवर आधारित 'स्मृतिमग्ना' हा संगीतमय कार्यक्रम अनन्वय फौंडेशन तर्फे आयोजित करण्यात आला होता. डॉ. माधवी वैद्य व नरेंद्र डोळे यांनी इंदिराबाईंच्या जीवनातील काही प्रसंगावर लिहिलेल्या संवादात्मक संहितेचे प्रभावी वाचन केले व गायिका अमृता कोल्हटकर यांनी इंदिरा संत यांच्या काहीं कवितांचे गायन केले. राहूल घोरपडे यांचे संगीत होते व निवेदिता मेहेंदळे यांची तबल्याची साथसंगत होती.

**६) दि. ५ फेब्रुवारी २०१३ : का. र. मित्रव्याख्यानमाला – दुसरे पुष्प :** कै. माधवराव मदाने स्मृतिव्याख्यान – अर्थतज्ज्ञ अरविंद परांजपे यांचे 'भारत आर्थिक महासत्ता होऊ शकतो का?' या विषयावर व्याख्यान झाले. व्याख्यानाच्या शेवटी उपस्थित श्रोत्यांपैकी काही वक्त्यांनी प्रश्न विचारून संवाद साधला.

**७) दि. ६ फेब्रुवारी २०१३ : का. र. मित्रव्याख्यानमाला – तिसरे पुष्प :** थोर साहित्यिक कै. श्री. ना. पेंडसे जन्मशताब्दी वर्षाच्या सांगतेनिमित्त ज्येष्ठ अभिनेत्री लालन सारंग यांचे 'रथचक्र आणि मी' या विषयावर व्याख्यान झाले.

**८) दि. ७ फेब्रुवारी २०१३ : का. र. मित्रव्याख्यानमाला – चौथे पुष्प :** महाराजा सयाजीराव गायकवाड यांच्या १५०व्या जन्म वर्षानिमित्त साहित्यिक बाबा भांड यांचे 'काळापुढे दृष्टी असलेले सयाजीराव गायकवाड' या विषयावर व्याख्यान झाले. चार दिवस चाललेल्या या व्याख्यानमालेला श्रोत्यांची भरघोस उपस्थिती लाभली होती.

**९) दि. १४ फेब्रुवारी २०१३ : राजेंद्र बनहट्टी गौरव व्याख्यानमाला – पुष्प पहिले :** मंगला आठल्येकर यांचे 'महिला आरक्षण की संरक्षण' या विषयावर व्याख्यान झाले. चैतन्य बनहट्टी व कुटुंबिय उपस्थित होते. गुलाब फूल देऊन त्या दोघांचे स्वागत करण्यात आले.

**१०) दि. १५ फेब्रुवारी २०१३ : राजेंद्र बनहट्टी गौरव व्याख्यानमाला – पुष्प दुसरे :** मुक्ता मनोहर यांचे 'स्त्रियांची सद्यस्थिती' या विषयावर व्याख्यान झाले.

**११) दि. १६ फेब्रुवारी २०१३ :** नियतकालिकांच्या संपादकांशी संवाद साधणारी सभा म. सा. परिषद व अंतर्नाद व आपले जग मासिक यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात आली होती. यानिमित्ताने झालेल्या चौथ्या सत्रात डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचे 'नियतकालिकांकडून आमच्या अपेक्षा' या विषयावर व्याख्यान झाले. सूत्रसंचालन विनिता तेलंग यांनी केले. त्याचप्रमाणे सकाळी १०.३० वाजल्यापासून ४ सत्रांत झालेल्या संपादक संवाद सभांचे तपशील असे, सत्र पहिले – प्रास्ताविक भानू काळे, कार्यक्रमाची रूपरेषा वसंत आपटे, सूत्रसंचालन सागर देशपांडे, उपस्थितांचा परस्पर परिचय सत्र दुसरे – 'नियतकालिकांपुढील आव्हाने व संधी' याविषयावर सर्व उपस्थितांनी आपली मते मांडली. आनंद आगाशे यांनी सूत्रसंचालन केले. सत्र तिसरे – 'पुढे काय? संवाद सभेची भावी दिशा' या विषयावर विचारविनिमय झाला. सूत्रसंचालन-विनोद शिरसाठ यांनी केले.

**१२) दि. १८ फेब्रुवारी २०१३ : श्री. म. माटे स्मृतिव्याख्यान –** विवेक सावंत यांचे 'मराठी भाषा आणि आधुनिक माहिती तंत्रज्ञान' या विषयावर

उद्‌बोधक व्याख्यान झाले. अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला.

**१३) दि. २१ फेब्रुवारी २०१३ : रा. श्री. जोग पुरस्कार प्रदानसोहळा –** प्रा. रा. श्री. जोग समीक्षा पुरस्कार यंदा प्रा. डॉ. विनायक तुमराम यांच्या 'आदिवासी साहित्य : दिशा आणि दर्शन' या स्वरूप प्रकाशन, नागपूर यांनी प्रकाशित केलेल्या ग्रंथास देण्यात आला. यासाठी परीक्षक म्हणून डॉ. कल्याणी दिवेकर व डॉ. मनोहर जाधव यांनी तर निमंत्रक म्हणून प्रकाश पायगुडे यांनी काम पाहिले. डॉ. न. म. जोशी अध्यक्षस्थानी होते. यांचा सत्कार केला. परीक्षकांचे सत्कार सुनील महाजन यांनी केले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी परीक्षकांच्या वतीने मनोगत व्यक्त केले. अध्यक्ष डॉ. न. म. जोशी यांच्या हस्ते प्रा. डॉ. तुमराम यांना पुरस्कार वितरीत करण्यात आला. प्रा. डॉ. तुमराम यांनी आपले मनोगत व्यक्त केले. डॉ. न. म. जोशींनी अध्यक्षीय समारोप केला.

**१४) दि. २५ फेब्रुवारी २०१३ : स्वा. वि. दा. सावरकर पुण्यतिथी व्याख्यान –** 'सावरकरांची काव्यप्रतिभा' विषयांवर चारुदत्त आफळे यांचे व्याख्यान झाले.

**१५) दि. २७ फेब्रुवारी २०१३ : कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कार कवी कुसुमाग्रज पुरस्कार वितरण समारंभ –** अझीम राहीनवाझ यांच्या 'कल्लोळांतील एकांत' व अजय कांडर यांच्या 'हत्रीइलो' या दोन कवितासंग्रहांना व अक्षरमानव प्रकाशन, पुणे व शब्द पब्लिकेशन, मुंबई या दोन प्रकाशनसंस्थांना यंदाचा कवी कुसुमाग्रज पुरस्कार रमण रणदिवे यांच्या हस्ते विभागून देण्यात आला. रमण रणदिवे व देणगीदार देवयानी अभ्यंकर यांचे सत्कार व स्वागत करण्यात आले. तसेच परीक्षकांपैकी आसावरी काकडे यांचा सत्कार करण्यात आला. राहीनवाझ यांनी मनोगत व्यक्त केले. रमण रणदिवे यांनी पुरस्कार वितरण व अध्यक्षीय समारोप केला. परीक्षक आसावरी काकडे यांनी मनोगत व्यक्त केले.

**१६) दि. २८ फेब्रुवारी २०१३ : राष्ट्रीय विज्ञान दिन –** 'मला गवसलेले दुर्मिळ जीवाश्म' या विषयावर डॉ. विद्याधर बोरकर यांचे 'सचित्रदीप' असे (SlideShow) व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी म. ना. गोगटे होते. मराठी विज्ञान परिषदेचे विनयर यांनी सूत्रसंचालन केले. विज्ञान प्रश्नमंजुषेच्या दहा विजेत्यांची नावे जाहीर केली. डॉ. बोरकरांनी श्रोत्यांशी प्रश्नोत्तर रूपात संवाद साधला. हा कार्यक्रम म. सा. परिषद व मराठी विज्ञान परिषद यांच्या संयुक्तविद्यमाने आयोजित करण्यात आला होता.

**टीप :** महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शहर शाखेच्या वरील सर्व कार्यक्रमांचे प्रास्ताविक व स्वागत करणे, वक्त्यांचा परिचय करून देणे, सत्कार करणे, सूत्रसंचालन करणे आणि आभारप्रदर्शन करणे – हे कार्य डॉ. माधवी वैद्य (कार्याध्यक्ष), प्रा. मिलिंद जोशी (प्रमुख कार्यवाह), श्री. सुनील महाजन (कोषाध्यक्ष), श्री. प्रकाश पायगुडे (स्थानिक कार्यवाह), नंदा सुर्वे (स्थानिक कार्यवाह) श्री. दीपक करंदीकर (स्थानिक कार्यवाह) तसेच पुणे शहर प्रतिनिधी डॉ. कल्याणी दिवेकर, नंदा सुर्वे आणि उद्धव कानडे यांनी केले आहे.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
स्थानिक कार्यवाह मसाप, पुणे.

## – म.सा.प. श्रीरामपूर शाखा –

**दि. २४ नोव्हेंबर २०१२ : सत्कार सोहळा –** दै. सार्वमतचे संपादक श्री. नंदकुमार सोनार यांना महाराष्ट्र राज्य संपादकपरिषदेचा आचार्य अत्रे पुरस्कार प्राप्त झाला म्हणून त्यांचा सत्कार करण्यात आला. अध्यक्ष ॲड. रावसाहेब शिंदे यांनी शुभेच्छा दिल्या. उपाध्यक्ष अविनाश आपटे यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह प्रा. डॉ. बाबुराव उपाध्ये यांनी सूत्रसंचालन केले. सौ. मीनाताई जगधने अध्यक्षस्थानी होत्या. प्रकाश कुलथे यांनी श्री. सोनार यांचा परिचय करून दिला. श्री. नामदेवराव देसाई यांनी या प्रसंगी आपले विचार प्रकट केले.

## – म.सा.प. नांदगाव शाखा –

**दि. १९ जानेवारी २०१३ :** कवी विजयकुमार मिठे यांचा 'गावगप्पा' हा कार्यक्रम झाला. याचवेळी दै. सकाळचे पत्रकार संजीव निकम यांना जिल्हापत्रकारिता पुरस्कार मिळाल्याबद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला. अध्यक्षस्थानी तहसिलदार सुदाम महाजन होते. विठ्ठल संधाने, डॉ. मधुकर कवडे, सुरेश शेळके, संदीप जेजूरकर, म. सा. प. अध्यक्ष दयाराम मिलाणकर उपस्थित होते. कोषाध्यक्ष सुरेश नारायणे यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. सूत्रसंचालन काशीनाथ गवळी यांनी केले. रमेश घोडके यांनी आभार मानले.

## – म.सा.प. वारजे - कोथरूड शाखा –

**दि. २७ जानेवारी २०१३ : वर्धापनदिन :** शाखेचा दुसरा वर्धापनदिन – प्रा. मिलिंद जोशी प्रमुख वक्ते व डॉ. माधवी वैद्य प्रमुख पाहुण्या होत्या. शाखा कार्यवाह गोपाळ कुलकर्णी यांनी अहवाल सादर केला. मधुकर नवले आणि चंद्रशेखर धर्माधिकारी यांनी आभार मानले.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह मसाप, पुणे.

**माधवराव पटवर्धन**

सकस वैचारिक विषय प्रामुख्याने प्रतिपादन करणाऱ्या पोतदारानंतर माधवराव पटवर्धन यांच्या हातात पत्रिकेची संपादन सूत्रे आली. एप्रिल १९३६ ते एप्रिल १९३७ या काळात 'पत्रिके'चे पाच अंक त्यांनी संपादित केले. 'पत्रिका' हे साहित्यिक तत्त्वचर्चेचे व संशोधनाचे व्यासपीठ असावे ही संपादकीय भूमिका त्यांनी घेतली असली तरीही साहित्यिक तत्त्वचर्चा आणि मनोरंजन याचा सुंदर गोफ त्यांनी विणला आहे. 'मुंबईतील महारांची गाणी' गोपीनाथराव प्रधान यांनी संग्रहीत करून पत्रिकेतून प्रसिद्ध केली आहेत. या समाजात विशेषत: विवाहप्रसंगी म्हटली जाणारी गाणी या लेखात उद्धृत केलेली आहेत. पटवर्धन यांच्या मनोरंजनाला स्थान देण्याच्या दृष्टीची ती प्रतीके वाटतात. 'ग्रंथपरीक्षण' या सदरात केवळ ललित वाङ्मयीन पुस्तकांचीच परीक्षणे न देता शास्त्रीय पुस्तकांसंबंधीही परीक्षणे देण्याचा दृष्टिकोन व्यापक वाटतो. 'सुलभ शास्त्रीय ज्ञान' या कर्वे-संपादित ग्रंथाचे परीक्षण आशयसमृद्ध आहे.



अनुक्रमणिका

'तेजस्वि नौ अधीतं अस्तु... मा विद्विषावहै।'

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे चे मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे आद्य प्रवर्तक



**विष्णु मोरेश्वर महाजनी**
पहिले अध्यक्ष व पत्रिका संपादक



**ना. गो. चापेकर**
कार्याध्यक्ष पत्रिका प्रकाशक



**डॉ. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर**
कार्यवाह

**'न जाणो या पत्रिकेसच काही काळाने स्वातंत्र्याचे पद मिळेल'**
- वि. मो. महाजनी (प्रथम अंक-संपादकीय)





पु.क किनरे मनोहर गणेश
८८. ३ अपर्णा अपा., २०३२/ब/५
सदाशिव पेठ,
पारिजात डिपार्टमेंट शेजारी,
पुणे - ४११ ०३०







**Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : January to March 2013**
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*



बुक-पोस्ट




प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.









अनुक्रमणिका